इतिहास.

इंग्रजी इतिहास व दुसरे प्रकारचे माहिती वरून

## जगन्नाथ प्रभाकर सरंजामे

यांणीं

तयार करून

# पुणें

पेठ शनवार मेहुणपुरा येथें

रावजी श्रीधर गोंधळेकर यांचे "जगद्धितेच्छु" छापखान्यांत

छापिला.





## आवृत्ति पहिली.

तारीख २० ऐप्रेल सन १८७२ इसवी.

मिति वैशाख शुद्ध १२ शके १७९४ अंगिरानामसंवत्सरे.

# अनुक्रमणिका.

वंशवृक्ष.

श्री

# राजधानीचें वर्णन.

उत्तर हिंदुस्थानांत आग्रा शहर प्रसिद्ध आहे. त्याचे दक्षिणेस सुमारें ३५ कोसांवर २६ ,,१५ उ. अ. व ७८ ,,१,, पू. रे. त्या स्थानीं ग्वालेर किल्ला आहे. त्या किल्ल्याचे माथ्याची लांबी सुमारें १¾ माईल व रुंदी सुमारें ३०० यार्ड आहे. किल्ल्याचा तट चिरेबंदी आहे, त्या किल्यावर कांहीं पाण्याचीं टांकीं आहेत, त्यांचें पाणी फार गोड व तें कधींही आटत नाहीं. हा किल्ला उभ्या सुळक्याच्या डोंगरावर बांधिला आहे. आणि त्याचे आसमंतात् लहान लहान टेकड्या फार आहेत. किल्ल्यावर चढण्यास रस्ता एक, तोही फार अवघड, त्या कारणानें त्याचा लौकीक फार प्राचीन काला पासून अजिंक ह्मणून आहे. किल्ल्याचे माथ्याची आकृति एक बाजू उंच, आणि एक बाजू सखल अशी आहे. ज्या बाजूनें किल्ला उंच आहे, तिकडील उंची पायथ्या पासून माथ्या पर्यंत ३४२ फूट आहे. गालव ऋषि फार दिवस त्या पर्वतावर आश्रम करून रहात असे, ह्मणून ग्वालेर असें नांव उत्पन्न झालें; अशी दंत कथा आहे.

किल्ल्याचे पूर्वेस जुनाट वस्ती आहे तीस ग्वालेर ह्मणतात. ग्वालेरचे दक्षिणेस एक कोसावर नवें शहर वसलें आहे; त्या शहरांत वर्तमान कालीं शिंदे सरकार वास करितें आणि त्याचा राज्यकारभार चालतो. त्या शहराचें नांव लष्कर पडलें आहे. हें शहर सांप्रत कालीं शिंदे सरकारचे राजधानीचें मुख्यस्थान आहे. त्या दोन शहरांचे मध्यभागीं एक लहान नदी आहे, तिचें नांव सुवर्णरेषा. त्या नदीचें पाणी उष्ण कालांत दरवर्षी आटतें. दोन शहरें आणि किल्ला त्यांचे सभोंवतीं कोस दोन कोसांचे अंतरानें डोंगर आहेत, त्या डोंगरांवर झाडें वगैरे अगदीं नाहींत. पर्जन्य काल खेरीज करून, ते सदां रखरखीत आणि तप्त असतात.

ग्वालेर प्रांतांतील हिंदु राजां विषयीं सन १००८ इसवी पर्यंत हकीकत लिहिलेली सांपडते. हा प्रांत किल्ला सुद्धां सन ११९७ आंत मुसलमान लोकांचे कबज्यांत गेला. दिल्लीचे बादशाहाचे आसन्न

असिस्टन्ट रेसिडेन्ट रहातो. या छावणीस मुरारची छावणी ह्मणता-
त.

---

हें वरील वर्णन त्या मिलटनचें ग्याजीटीयर भाग १ला पान ५१६-
यावरून व. लोकांचे सागण्या वरून लिहिलें आहे.

# भाग १ ला.

## सन इसवी १७१५ शालिवाहन शके १६३६ पासून सन इ. १७६१ शा. श. १६८३ पर्यंत.

## राणोजी शिंदा व त्याचा औरस वंश.

दक्षिण हिंदुस्थानांतील यवन लोकांचें राज्य मोडल्यावर मराठे लोकांचें राज्य स्थापन झालें, तेणें करून स्वधर्म आणि स्वराज्यांचा जीर्णोद्धार झाला. यवन लोकांचें राज्य त्या देशांत बरेंच दिवस होतें. ते समयीं त्यांनीं हिंदु राज्यें बहुतेक बुडवून हिंदु धर्माचा उच्छेद करण्यास आरंभ केला. तो क्रम तसाच चालला असता तर हिंदु हीं अक्षरें देखील आज ऐकावयास नयेती; परंतु ईश्वरी सत्तेनें दक्षिणेंत शिवाजी उत्पन्न झाला. त्यानें यवनी राज्य ग्रासून हिंदु राज्याची आणि धर्माची स्थापना केली. पुढें शिवाजीचे वंशज छत्रपति झाले. त्यांचे कार्किर्दीत जे अष्टप्रधान झाले, त्यांत पेशवे महान पराक्रमी होऊन गेले. त्यांनीं मराठे लोकांचा भगवा झेंडा उत्तर हिंदुस्थानांत चालविला; ते समयीं बाजीराव बल्लाळ यांचे पदरीं बरेंच शूद्र लोक उदयास आले. त्यांत शिंदे मोठे प्रतापी झाले. त्यांनी आपलें स्वतंत्र राज्य हिंदुस्थानांत ग्वाल्हेर येथें स्थापन केलें, तें ईश्वरानें आज पर्यंत कायम ठेवलें आहे. त्या राज्याची उत्पत्ति व वृद्धि कशी होत गेली व सांप्रतची स्थिति कशी आहे ही हकीकत खालीं लिहिली आहे.

ग्वाल्हेरचे राज्याधिकारी जातीचे शूद्र आणि आडनावाचे शिंदे आहेत. शूद्र जातीचे दासी स्त्रीस ब्राह्मणा पासून संतती झाली असतां, त्या संततीस शिंदे हें उपनाम देण्याची चाल फार दिवसां पासून चालत आली आहे. व ही चाल इतकी दृढ झाली आहे कीं, शूद्र जातीचे मनुष्याचें आडनांव शिंदे असलें ह्मणजे त्या मनुष्याची-

अथवा त्याचे पूर्वजांची उत्पत्ति वर लिहिल्या प्रमाणें झाली असावी - असें अनुमान लोक स्वाभाविकपणें करतात. थोरले बाजीरावा जवळ एक यवन जातीची नाटक शाळा होती. तिचें नाव मस्तानी. तीस एक पुत्र झाला त्याचें नांव आली बाहादर, त्याचे वंशिक जसे बांद्याचे अधिकारी झाले, तसे ग्वालेरचे अधिकारी पेशव्या पासून वाढल्यानें व आडनावाचे संबंधानें बांद्याचे संस्थानिका सारखे पेशव्याचे संबंधी असतील असें वाटतें परंतु पेशव्यांचा आणि ग्वालेरच्या अधिकाऱ्यांचा धनीपणा व सेवकपणा या शिवाय दुसरा संबंध नाहीं. जाधव, पवार, निंबाळकर, शिर्के, हीं कुळें जशीं दक्षिणेंत पुरातन आहेत; तसें शिंद्याचें कुल ही फार दिवशी वतनदार जातीचे गोड आहे व शिंदे या उपनांवाच्या अर्था प्रमाणें त्या कुलाची उत्पति नाहीं असें पुढील इतिहासा वरून कळेल.

नदीचा उगम ज्या स्थानीं होतो तेथें किती सूक्ष्म असतो, आणि उगमा पासून पन्नास कोसांवर जाऊन ती नदी पाहिली असतां केवढी भव्य झाली असते; त्या नदीचे भव्य पात्राचा आणि उगमाचा विचार केला असतां जसा चमत्का वाटतो तसा ज्या पुरुषानें हें राज्य संपादन केलें; त्याच्या ते वेळच्या स्थितीशीं आणि सांप्रत जे राज्याधिकारी आहेत, त्यांचे वैभवाची तुलना केली असतां चमत्कार वाटेल. पेशवे आणि शिंदे हे उभयतां सरदार एका समयास प्रसिद्धीस येऊन बरोबर वाढत गेले, असें म्हटलें तरीं चालेल. बाळाजी विश्वनाथ पेशवा याजपाशीं एक मराठा वाई देशांतील कण्हेरखेड गांवचा पाटील हुजऱ्या होता. त्याचें नांव राणोजी शिंदा होतें. राणोजीचे पूर्वज ब्राह्मणी नावाच्या घराण्यांतील पादशाहाच्या पदरीं शिलेदार होते. औरंगजेबाचे पदरीं एक कण्हेर खेड गांवचा शिंदा मोठा सरदार होता. त्या सरदारास एक मुलगी होती, तिशीं शाहुराजानें लग्न बादशाहानें लाविलें. नंतर शाहू दिल्लींत असतांच ती मुलगी मरण पावली; व कांहीं दिवसांनीं तिचा बापही मरण पावला. पुढें हे

(margin note: सन १७१४ इसवी. शके १६३६)

कण्हेर खेडचे शिंदे दरिद्रावस्थेंस मिळाले असावे, असें वाटतें. कण्हेरखेडकर शिंदे आपली उत्पत्ति रजपूत वंशापासून सांगतात.

कोल्हापुराजवळ रत्नागिरी नांवाचा एक डोंगर आहे. त्याजवर जोतीबा ह्मणून प्रसिद्ध देव आहे. तो या सरदारांचा कुलस्वामी होय. त्या देवास हल्लीं शिंद्या कडून दरसाल साहा हजार रुपयांची नेमणूक पावत आहे. सदा पत्रांवर जो शिक्का* हे सरदार करतात त्या शिक्क्यांत कुलस्वामीचें, गादीवर जो पुरुष असेल त्याचें, आणि त्याच्या बापाचें अशीं तीन नावें कोरलेलीं असतात.

गावचे मोकदम असणें हें त्या शूद्र जातींत मोठें सन्मान कारक होय, असें असतां राणोजीनें पाटिलकी सोडून अशी हलकी चाकरी कां पतकरली असावी, अशी शंका उत्पन्न होते; त्या शंकेचें समाधान त्या कालचे देश स्थिती वरून होतें. त्या देशांत त्या कालीं राज्य क्रांतीस आरंभ झाला होता. ते समयीं पराक्रमी मनुष्यें रंकाचे स्थिती वरून रावाचे योग्यतेस सहज आणि वरचेवर चढत. पेशव्याचे सन्निध असल्यानें आपला उर्जित काळ कधीं तरीं होईल त्या इच्छेनें तो पेशव्यां जवळ चाकरीस राहिला असावा असें वाटतें. सांप्रत श्रीमान लोकांजवळ जे हुजरे असतात, त्यांचे अंगीं सद्गुणाचा लेशही नसतो. ते आपल्या धन्यांस दुर्व्यसनें लावितात, आणि यत्किंचित् लोभानें दुराचरणास प्रवृत्त होतात, इत्यादि कारणां वरून लोकांत त्यांची प्रतिष्ठा नसते. प्राचीन कालचे हुजरे अगदीं भिन्न होते. कुलीन, वतनदार, शाहाणा मनुष्य पाहून हुजऱ्याचे चाकरीस ठेवीत. ते हुजरे आपले जिवापेक्षां धन्याचे जिवास, अब्रूस, हितास फार जपत. आणि प्रसंग पाहून सल्ला मसलत सांगत; तेणें करून त्यांची प्रतिष्ठा लोकांत फार असे. पेशव्यांचा हुजऱ्या राणोजी त्यांची प्रतिष्ठा त्या

+ ही माहिती सदां पत्रां वरून लिहिली आहे.

* शिक्क्यांतील अक्षरें (जोतिस्वरूप माहारजी सुत दौलतराव शिंदे चरणीं तत्पर निरंतर).

कालीं कशी असेल, हें वांचणारांच्या लक्षांत येईल.

बाळाजी विश्वनाथ मेल्यावर त्याचा मुलगा बाजीराव पेशवा झाला. त्याजपाशीं राणोजी कांहीं दिवस हुजऱ्याच होता. बाजी रावानें राणोजीची स्वामी सेवेंत तत्परता पाहून त्यास प्रथम करोल नेमिला.

सन इसवी १७२०. म्हणजे शालिवाहन शके १६४२.

हें नांव ज्याला घोड्यावर बसून निशाण मारतां येतें, त्यास देत-असत. माल्कम साहेबानें राणोजीची बढती होण्याचें कारण-असें लिहिलें आहे कीं, बाजीराव एक दिवस शाहू राजाचे दरबा-रांत फार वेळ बसला होता; ते समयीं राणोजी त्याचा जोडा उरा-शीं धरून निजला होता. हें पाहून बाजीरावास फार आनंद झा-ला, आणि त्यानें त्यास लागलाच पाग्या नेमिला. परंतु ही गोष्ट-खरी असेल असें वाटत नाहीं. कारण राणोजीस प्रथम करोल बाजीरावानें केलें, नंतर पाग्या नेमिला. त्या विषयीं लेखी आधा-र आहे. दुसरें असें कीं, ज्या मनुष्याचें काम जोडा संभाळण्याचें आहे, त्यानें तें काम बरोबर केलें, त्यांत यजमानास कांहीं आ-नंद होण्यास विशेष कारण दिसत नाहीं. त्या वरून अशा क्षु-ल्लक कारणानें बाजीरावानें राणोजीस वाढविलें असें वाटत-नाहीं. त्यास वाढविण्यास दुसरीं कांहीं कारणें झालीं असतील असें वाटते.

बाजी राव बल्लाळ पेशवाईचे पदारूढ झाला. तेव्हां पासून-आपला अमल बसविण्या करितां खानदेशांत आणि माळव्यांत स्वाऱ्या करूं लागला. ते सम-यीं बऱ्हाणपुरास बादशाही अमलदार एक यवन होता; त्याशीं बाजी रावाचा युद्ध प्रसंग झाला, त्यांत राणोजी शिंदा प्रथम प्रसि

सन १७२४ इसवी शके १६४६.

---

+ ही संज्ञा, जो मनुष्य कांहीं स्वारां निशीं चाकरी करितो व त्या बद्दल-कांहीं मुलुख अथवा कांहीं नक्त नेमणूक त्यास नेमलेली असते,

ह्रीस आला.

चौथ, सरदेशमुखी, हे अम्मल माळव्यांत बसल्यावर, चौथाई

इसवी सन १७२५ शके १६४७. पैकीं मोकासा अम्मल बाजीरावानें राणोजीस फौजे चे खर्चास सरंजाम दिला. नंतर राणोजी माळव्यांत आपली सत्ता बसवीत असतां, बाजीराव राणोजीस व होळकरास बरोबर घेऊन दिल्लीस गेला. आणि शहरा नजीक झिलु तलावावर छावणी करून राहिला. बादशाही फौज पेशव्यावर चाल करून आली. आणि उभय सैन्यांचें युद्ध झालें. त्यांत राणोजी शिंदे व मल्हार

इसवी सन १७२६ शके १६४८. राव होळकर यांणीं फार मरदुमकी करून बादशाही फौज पिटून लाविली. आणि त्या फौजेचे दोन हजार घोडे व एक हत्ती पेशव्यास लूट मिळाली. पेशवा विजयी होऊन परत आल्यावर कांहीं दिवसांनीं निजाम उल्ल मुल्लुख मोठें सैन्य घेऊन दिल्लीहून पेशव्यावर दक्षिणेंत जावें, ह्या इरायानें निघाला. बाजीरावास हे वर्तमान कळतांच तो राणोजी शिंदे वगैरे सरदार बरोबर घेऊन निघाला, आणि त्यानें निजामास भोपाळावर गांठलें. त्याचे फौजेस चोहोंकडून सामोग्री बंद केली, तेणें करून निजाम बेजार झाला. आणि त्यानें काटला पाय घेतला, तरीं पेशवे व शिंदे त्याचा पिच्छा सोडीनात तेव्हां त्यानें तह करून माळवा, नर्मदा आणि चंबळ नदी,

इसवी सन १७३२ शके १६५० त्याचे मधील हे दोन प्रांत बाजीरावास दिले. पुढें राणोजी दक्षिणेंत आला आणि बाजीराव त्या प्रांतींच राहिला.

---

१ रुपयांत चार आण्यांचा हिस्सा.

२ शेंकडा दहा अथवा साडेबारा रुपयांचा हक्क.

३ मोकासा आणि साहोत्रा हे चौथाईचे दोन भाग आहेत. जर चौथाई १०० रुपये असेल, तर साहोत्रा ६ रुपये आणि मोकासा ९४ रुपये याप्रमाणें हिशेब करितात.

४ चौथ, सरदेशमुखी, मोकासा, साहोत्रा, असे अनेक प्रकारचे हिस्से मराठे लोकांनीं बसवितात केले होते. त्या प्रत्येक भागास अम्मल ह्मणतात.

फिरंग्यांनीं उत्तर कोंकण वसई वगैरे मुलुख आपल्या ताब्यां-
इसवी सन- } त घेतला, तो सोडविण्या करितां राणोजी शिंद्यास
१७१९ शके १६६१. } बरोबर घेऊन चिमाजी आपा पेशवा स्वारीस निघा
ला. राणोजीनें पृथक् फौज घेऊन तारापूर, डाणू वगैरे ठिकाणीं पे
शव्याचा अम्मल बसविला, आणि चिमाजी आपा वसई घेण्याक-
रितां लढत होता, त्याचे कुमकेस जाऊन वसई सर केली. बाजीरा-
व, भोसल्यावर स्वारीस गेला होता तों नसराबादेस असतां, ना-
दरशाहा काबुलांतून दिल्लीस आला, आणि त्यानें मोठा प्रळय
केला. बाजीरावानें चिमाजी आपास असें लिहिलें कीं, राणोजी
शिंद्यास तावडतोब पाठवून द्यावा, त्यावरून राणोजी नसराबा-
द मुक्कामीं बाजीरावास मिळाला. नर्मदा आणि चंबळ त्या दोन न
द्यांचे दरम्यानचा मुलुख व माळवा पूर्वीं निजामानें पेशव्यास-
दिला होता, त्याच्या सदा बादशाहानें पेशव्यांस करून दिल्या.
नंतर बादशाहानें पेशव्यांशीं कसें वागावें या बद्दल जयपूरचा-
राणा जयशिंग याचे विद्यमानें कांहीं करार करले. त्यांत बाद
शाहाचे वागणुकेची खात्री राण्यानें केली. व पेशवे करारा प्र-
माणें वागतील हा जिम्मा राणोजीनें घेतला. राणोजीचे मु-
लुखाचें काम पहाण्यास एक गरीब सा कुळकर्णी बाजीरावा-
नें दिवाण नेमून दिला होता त्यास रामचंद्र बाबा ह्मणत, तो जातीचा
शेणवी असे. पेशव्याचे जोडे उचलले येणें करून राणोजीस ऐ-
श्वर्य प्राप्त झालें, हें जाणून तो त्याच्या जोड्यावर देवा प्रमाणें-
भक्ति ठेवीत होता, असें ह्मणतात. पेशव्यांच्या दर एक स्वारीस
राणोजी व मल्हारराव होळकर बरोबर असत, येणें करून त्या
उभयतांचा अत्यंत स्नेह होता. राणोजी माळव्यांत स्जालपूर
इ. सन १७४५ } गांवीं मरण पावला, तेव्हां पासून त्या गांवास-
शके १६६७. } राणोगंज असें ह्मणतात.

राणोजी शूर आणि साहस कर्मी असे, त्या कारणानें
त्याची भर भर चरित होऊन तो मोठ्या योग्यतेस आला. त्यानें

पूर्वज मुसलमान लोकांचें त्या देशांत आगमन झाल्या पासून शिपा ई गिरी करून वरेच लौकिकास आले होते. नंतर कालयोगानें सांप्रत दक्षिणेंतील सरदार लोकां प्रमाणें हें शिंद्यांचें घराणें अगदीं-जीर्ण दशेस आलें होतें, त्याचा राणोजीनें जीर्णोद्धार केला. त्यानें-आपलें सर्व आयुष्य मुसलमानाचे हातून स्वदेश सोडविण्या करितां खर्च केलें. आणि यश मिळवून आपले वंशिकांस गांवचे चावडीचे-त्रासांतून मुक्त करून राज्य पंथास लाविलें. वरील कलमांत असें लिहिलें आहे कीं, राणोजीच्या आणि मल्हाररावाचा अत्यंत स्नेह होता. मालकम साहेब लिहितात कीं, राणोजीस पैशाची ओढ फार असे, ह्मणून तो मल्हाररावाशीं स्नेहानें वागत असे; हें खरें असेल सें वाटत नाहीं. कारण मनुष्यांचा स्वभावत असा आहे कीं, त्यांचा परस्पर स्नेह जडण्यांस फार थोडें कारण लागतें. जर दोन मनुष्यांचा नेहमीं सहवास असेल व त्यांचे स्वभाव जर जमत असतील तर-तो स्नेह इतका पुढें वाढतोंकीं, ते दोघे परस्परांस बंधूसारखें मानतात. आतां राणोजी व मल्हारराव त्या दोघांचा फार सहवास असून त्यांचे स्वभाव ही जमत असत. एवढ्या वरून राणोजीनें मल्हाररावाशीं केवळ पैशा करितां स्नेह ठेविला होता, असें ह्मणणें हें अयोग्य आहे. दुसरें असें कीं, हे दोघे पुरुष सामान्य माणसा सारिखे नव्हते. ते मनाचे थोर, दिलदार, व महत्कर्मे करणारे होते. ते सर्व देशास आपलें कुटुंब समजत. अशा पुरुषांस, मालकम साहेबानें लिहिलेला दोष लावणें हें ठीक नाहीं. व असें लिहिण्यांत मालकम-साहेबांची ही विशेष चुकी नाहीं. कारण इंग्लिशानीं आज पर्यंत कांहीं लोकांची वर्तणूक पाहून त्यावरून सर्व हिंदु लोकांच्या स्वभावें-धोरण बांधिलें आहे; तें असें कीं, हिंदु लोक बेमान आहेत, व आत्म कार्यार्थ कांहीं करण्यास मागें पुढें नपाहाणारे. व कपटी असे आहेत. त्या धोरणावरून मालकम साहेबानें लिहिलेलें आहे असें वाटतें. पण राणोजीच्या सर्व वर्तनाचा विचार केला असतां असें वाटतें कीं, अशा गुणवान पुरुषाचे मनांत वरील गोष्टीचा विचार ये

प्याचा ही संभव नाहीं. राणोजीस लग्नाची बायको एकच होती, तिचें नांव मिनाबाई होतें. त्याची एक राख होती, ती रजपूत जातीची होती. तिच्या नावाची पक्की माहिती नाहीं. तिचें नांव भिमाबाई होतें, असें रावजी* पेंडसे सांगतात. लग्नाच्या बायकोस तीन मुलगे झाले. प्रथम जयापा (उर्फ जयाजी), २ रा दत्ताजी, आणि ३ रा जोतीबा (उर्फ जोत्याजी). राखेस महादजी आणि तुकोजी असे दोघे होते. राणोजी वारल्यावर त्याचे पाठीमागें जयापा त्याचें सरदारीचें काम चालवूं लागला.

होळकर, सूरजमल्लजाठ, आणि जयाजी शिंदा त्या त्रिवर्गास दिल्लीचे वजीरानें रोहिलखंडांतील बंड मोडण्यास बलाविलें. त्यावरून त्यांनीं तिकडे जाऊन तें बंड मोडलें. वजीरानें जयाजी शिंदा, होळकर, व जाठ त्यांस रोहिलखंडांत कांहीं मुलुख दिला. दोन वर्षीं नंतर पेशव्यांनीं माळवा मांत आपले पदरचे सरदारांस वांटून दिला. त्यांत समारें पाऊणकोटीचा मुलुख जयाजीचे वांटणीस आला. जयाजीचा उत्कर्ष वर लिहिल्या प्रमाणें हिंदुस्थानांत झाला. त्याचे भाऊ त्याचे ऐश्वर्यावर मौज करीत बसले नाहींत. ते सर्व पराक्रमी होते ह्मणून त्यांस आयतें पिठावर रेघा ओढणें आवडेना. कांहीं तरी कृत्य करून आपण प्रसिद्ध व्हावें, अशा इराद्यानें ते उद्योग करूं लागले. आपल्या पित्याचे संपत्तीवर आपला वडील भाऊ आयता नागोबा होऊन बसला, ह्मणून स्पर्धा करून हलकेपणानें भाऊबंदकीचे वाद खेळत ते बसले नाहींत. तसेच आपल्या पित्याच्या पराक्रमाच्या बढाया सांगून आणि भावाच्या संपत्तीचा गर्व करून लोकांत मिरवले नाहींत. ते पेशव्यांचे लश्करांत इतर शिलेदारा सारखे चाकरी करीत अ-

(सन इ. १७५० श. के. १६७२.)

---

* गणेश कृष्ण उर्फ रावजी पेंडसे हे गृहस्थ फार वृद्ध असून त्यांस पेशव्यांच्या कारकीर्दींतील पुष्कळ गोष्टी माहीत होत्या. रावजीचे पूर्वज व रावजी पेशव्यांचे दसरांत कारकून होते.

सन.

हैदराबादचा सुभेदार सलाबत जंग फराशी लोकांस मदत घेऊ न पेशव्यांचे राजधानीवर येत होता. त्यास पेशव्यांचे- फौजेनें दमदम्याचे नके मांबा नजीक जाऊन रोखलें. आ णि मोठी लढाई झाली. त्यांत सुभेदाराचा पराभव होऊन महादजी आणि दत्ताजी हे प्रथम प्रसिद्धीस आले. नंतर रघुनाथराव पेशवा याज बरोबर दत्ताजी गुजराथचे स्वारीस गेला. आणि अमदाबाद घेऊन त्या देशांत पेशव्याचा अम्मल बसविला. इ कडे जयाजीनें दिल्लीचे वजिरास साह्य करून बाद शाहास कैद करून दुसरा बादशाहा गादीवर बसविला. इतक्यांत बाजी शिंग आणि राम शिंग हे दोघे भाऊ जोनपुरचे संस्थाना करीतां कलह करूं लागले. रामशिंगानें पेशव्यास मदत मागितली.- त्यावरून पेशव्यानें जयाजी शिंद्यास आज्ञा केली कीं, तुह्मीं जाऊन कलह मोडावा आणि संस्थानाचा बंदोबस्त करावा. ह्मणून जयाजी मोठी फौज घेऊन तिकडे गेला. त्यानें प्रथम बाजी शिंगास आप- सांत तंटा तोडावयास सांगितलें पण तो ऐकेना. नंतर त्यानें बा- जी शिंगास एका गांवांत कोंडिलें. बाजी शिंगानें दोन मारेकरी पा- ठवून जयाजीस नागोऱ्यास मारविलें. जयाजी शिंदा वारल्यावर त्याचा कनिष्ठ भाऊ दत्ताजी त्यास त्याची सरदारी प्राप्त झाली. रघुनाथ राव पेशवा लाहोराकडे स्वारीस गेला होता, ते समयीं त्याज बरोबर दत्ताजी, जोत्याजी, महादजी, आणि जयाजीचा मुलगा जनकोजी असे चौघेजण होते. अहमद शाहा- आबदल्ली काबुला कडून मोठी फौज घेऊन लाहोरांत आला आणि रघुनाथ रावाचे पाठीस लागला ते समयीं आबदल्लीची आणि पेश व्यांची लढाई दिल्ली नजीक रुधिर गांवीं झाली. तेथें दत्ताजी पड ला; त्याच प्रांतीं कांबीर गांवीं जोत्याजी पडला, आ णि त्या प्रसंगांतून महादजी आणि जनकोजी जीव वांचवून पळाले. दत्ताजी व जोत्याजी त्यांचा मृत्यु पावल्याचा जागा

सन इ. १७५१ शके १६७२.

इ. सन १७५५ शके १६७७.

सन इ. १७५५ शके १६७७.

सन इ. १७५९ शके १६८१.

मात्र मालकम साहेबानें लिहिल्या आहेत. शक कांहीं लिहिलेले नाहींत. परंतु ते उभयतां सन इसवी १७५९ ह्मणजे शके १६८१ त मरण पावले असावे; असें जुने लेखा वरून समजतें.

दोन वर्षांनंतर अहमदशाहा आबदल्ली आणि पेशवे त्यांची लढाई सोनपत पानपतावर झाली. ते वेळेस पेशव्यांचे बरोबर जनकोजी व महादजी हे होते. पेशव्यांचा मोड होऊन त्याचे फौजेची दाणादाण झाली; त्यांत जनकोजी घायाळ झालेला शत्रूचे हातीं सांपडला. त्यानीं त्यांची कांहीं दया न करितां त्यास ठार मारलें. त्या दाणादाणींत कांहीं लोक पळाले त्यां बरोबर महादजीही पळाला. जनकोजी बरोबर राणोजीचा औरस वंश बुडाला. त्याचा राखे पासून झालेला वंश मात्र राहिला. एवढी मोठी सरदारी राणोजीचे बिदुर वंशाकडे चालवावी न चालवावी त्याचा मोठा विचार पेशव्याचे दरबारांत पडला. रघुनाथराव पेशव्याचे मनांत ही सरदारी शिंद्याचे अस्सल वंशांतील कोणा पुरुषास सांगावी; व बिदुर वंशिकांनीं कारभार करावा, असें होतें या वरून त्यानें ती सरदारी मानाजी फांकइ. सन १७६५ शके १६८७. ह्यास बाहाल केली; परंतु ही योजना माधवराव पेशवे, नाना फडणवीस व हरीपंत तात्या फडके त्यांस नापसंत झाल्यानें ती फार दिवस चालली नाहीं. माधवरावानें मानाजीस काढून बिदुर वंशांतील महादजी व केदारजी त्या उभयतांस त्या सरदारीवर कायम केलें. तेव्हां पासून एकटा महादजीच सरदारी चालवूं लागला. सन इ. १७६७ शके १६८९.

---

१ असें जुन्या लेखा वरून समजतें. वरील भाग ग्रांडफ साहेब यांच्या इतिहासाचें पुस्तक १ भाग १४।१५ व पुस्तक दोन भाग १।२।५ या वरून व मालकम साहेब यांचे इतिहासाचा भाग एक यावरून लिहिला आहे.

# भाग २रा.

## सन इसवी १७६१ शके १६८३ पासून सन इ. १७९४ शके १७१६ पर्यंत.

## महादजी शिंदा ऊर्फ पाटिलबावा.

महादजीचा जन्म कोणते शकांत झाला हें बरोबर समजत नाहीं. परंतु पेशव्याचे दप्तरांतील जुनाट कारकून रावजी पेंडसे असें सांगतात कीं, त्याचें वय मरण समयीं ६० किंवा ६२ वर्षांचें होतें. यावरून त्याचा जन्म सुमारें सन इसवी १७३२ शके १६५४ चे सुमारास झाला असावा असें अनुमान होतें. तो बाल्यदशेंत असतां, त्याचे अंगीं स्वाभाविक अकलेचे अंकुर आणि भावि राज चिन्हें दिसूं लागलीं होतीं; लहान पणा पासून तो आपले सावत्र भावावर प्रीति करीत असे. सोनपत पानपतचे लढाईंत मराठे लोक पळाले. त्याज बरोबर महादजी पळत असतां त्याचे पाठीस शत्रूचे गिलच्या फौजेंतील एक रोहिला पठाण लागला. त्यानें हातीं न सांपडावें, म्हणून महादजीनें फार यत्न केला. पण त्याची बसण्याची घोडी थकल्यामुळें त्याचा इलाज चालेना. नंतर पठाणानें त्यास आडपळें आणि त्यावर एक तरवारीचा हात करून त्यास घायाळ केलें त्या वारानें महादजीस मूर्च्छा येऊन तो एका खड्यांत पडला. तो बेशुद्ध असतां पठाण त्याची चीज वस्त व बसण्याची घोडी घेऊन पळाला. त्या प्रसंगांत महादजीचा पाय दुखावला. तो नीट न होतां जन्मभर अधूच राहिला. ज्या खड्यांत महादजी पडला होता, त्या रस्त्यानें एक पेशव्याचे फौजेंतील भिस्ती पळून जात होता. त्यानें महादजीस पाहिलें आणि त्यास दया उत्पन्न होऊन त्यानें महादजीस आपले बैलावर घालून पेशव्यांचे फौजेंत आणिलें. त्या रोहिल्या पठाणाची दहशत महादजीस कांहीं दिव

स इतकी होती कीं, तो कधीं कधीं झोंपेंतून या भयानें दचकून उठत असे.

मागील भागांत असें सांगितलें कीं, सोनपत पानपतचे लढाईंत जनकोजी पडला. तेव्हां महादजी व केदारजी त्या चुलत्या पुतण्या कडे पेशव्यांनीं सरदारी सांगितली. पुढें रघुनाथराव उर्फ दादासाहेब यानें जुन्या सरदारांत पुष्कळ घालमेल केली. त्या मध्यें महादजी व केदारजी या उभयतां कडून सरदारी काढून रघुनाथ रावानें मानाजीस सांगितली. हा मानाजी फांकडा शिंद्याचे अस्सल वंशा पैकीं होता. असें सांगतात. ज्या सरदारांच्या सरदाऱ्या दूर केल्या ते खिन्न होऊन मोंगलाईंत हैदरा बादचा निजामाकडे निघून गेले. त्या वेळेस महादजी, सुलतानजी निंबाळकराकडे बिडास गेला. निंबाळकर हा मोगला कडील बीड महालचा ठाणेदार होता. त्याची भाची महादजीची बायको होय. तिचें नांव अन्नपूर्णा बाई, तिला तिच्या मामानें मौजे खोकर मोह परगणें जाम खेड हा गांव आंदण दिला होता त्या गांवा नजीक मौजे राख मोह या नावाचा एक गांव आहे. तेथें एक अवलिया फकीर रहात असे त्याचें नांव मनसूर शाहा वली. त्या फकीराची सेवा कांहीं दिवस महादजी करीत होता. त्याचे आशीर्वादें करून महादजीस सरदारी मिळाली. त्या कारणानें शिंद्याचे दौलतीस फकीरी दौलत असें ह्मणतात. पुढें कांहीं दिवसांनीं केदारजीही दूर झाला आणि एकटा महादजीच सरदारीचें काम चालवूं लागला. याचा उत्कर्ष होतांच त्यानें त्या फकिरास कांहीं इनाम गांव देऊन त्यास संतुष्ट केलें व ज्या भिस्त्यानें महादजीस बैलावर टाकून आणिलें यासही कांहीं गांव इनाम देऊन त्यास भाई असा किताब दिला. तेव्हां पासून ही भिस्ति राणे खान भाई या नांवानें प्रसिद्ध झाला.

सन इ. १७६१
शके १६८३.

सन इ. १७६५
शके १६८७.

सन इ. १७६७
शके १६८९.

---

☞ + टीप पुढील पृष्ठावर पहा.

अहमदशा अबदल्ली सोनपतचे लढाईंत विजयी होऊन परत काबुलास गेला त्या वेळेस मराठ्यांची हिंदुस्थानांतील सत्ता अगदीं नाहींशी झाली होती, परंतु बादशाही अंमलदारांत आपसांत कलह उत्पन्न झाले; येणें करून मराठे लोकांचा पाय पुनरपि हिंदुस्थानांत शिरकण्यास चांगली संधि बनून आली. पेशव्यांनीं आपला अम्मल बसविण्या करितां, महादजी शिंदे, विसाजी कृष्ण बिनीवाले व रामचंद्र गणेश कानडे त्या तिघांस फौज देऊन हिंदुस्थानांत रवाना केले. त्या तिघां सरदारांनीं एकविचारें वागून हिंदुस्थान पुनः काबीज करावें असा मूकसंकेत ठरला होता. त्या तिघां मध्यें महादजीचा फौजेचा भरणा पुष्कळ होता; या कारणानें तो स्वतंत्रपणानें वागूं लागला. बाकीचे दोघे सरदार सैन्याच्या न्यूनते मुळें महादजीचे मर्जीनें वागत असत. दक्षिणेंतून निघाल्या पासून महादजीचा मनोदय आपलें स्वतंत्र राज्य स्थापन करण्याचा होता. जातांनां माळव्यांतील रजवाडे लोकां कडून तो खंडण्या आणि मुलूख पेशव्यांचे नांवानें करून घेई, आणि आपले मुलुखांत आणि खजिन्यांत सामील करी.

हिंदुस्थानांत शिंदे व होळकर त्या सरदारांनीं रजपूत आणि मुसलमान लोकां पासून राज्य संपादन केलें. हे उभयतां सरदार फार स्नेहानें वागत असल्या मुळें किती एक रजवाड्यां कडील खंडण्यांत व किती एक माहालांत व गांवांत उभयतांच्या वांटण्या सारख्या असत. मल्हार राव होळकर मृत्यु पावल्यावर त्याचे मुलुखांत त्याची सत्ता अगदीं कमी होऊन गोलेशाईस आरंभ झाला. कांहीं प्रांतांत स्वस्थता राहिली होती, ती केवळ महादजीचे दोस्तीनें व जरबेनें राहिली होती असें समजलें पाहिजे. महादजी शिंदे व होळकर त्यांत वसूलाचे विभागाचे कारणानें कधीं कधीं कलह उत्पन्न होऊन लढाई होण्याचा प्रसंग येई; परंतु ज्या कारणा वरून कलह उत्पन्न झाला असेल, त्याचा निकाल होतांच, ते पुनः लागलेच एकत्र होत. मल्हार रावाच्या मरणा नंतर मरा–

---

* त्या भिस्त्याचा आणि फकीराचा वंशांतील लोक लष्करांत मोमत जाहागीरदार पशोभित आहेत.

हे सरदारांत महादजीच प्रमुख होता त्यानें मल्हार रावाच्या मागें त्या घराण्याशीं चांगला स्नेह ठेविला होता.

मल्हार रावाच्या मरणानंतर, त्याचा दिवाण गंगाधर येशवंत चंद्रचूड यानें अहिल्याबाईस ( मल्हार रावाची सून व वारस ) असें सांगितलें कीं, राज्यकारभार करण्यास पुरुष पाहिजेत स्त्रियांचे हातून हें काम चालणार नाहीं. तर कारभार चालविण्यास दत्तक पुत्र घ्यावा, व तुम्हीं आपल्या खासगीकडे खर्चास कांहीं मुलुख ठेवावा, व त्या दत्तविधानाचे बेतास रघुनाथराव पेशव्यानीं अनुमोदन दिल्यास त्यास कांहीं बक्षीस द्यावें लागेल. ही व्यवस्था रघुनाथ रावास पसंत पडली. त्यानें महादजीस सांगितलें कीं, तुह्मी गंगाधर येशवंतानें सूचविलेली व्यवस्था अहिल्याबाई कडून कबूल करवावी. ही व्यवस्था होळकराच्या घराण्यास निर्बल करण्याकरितां रघुनाथरावानीं केली आहे. हें महादजीस कळतांच रघुनाथ रावास त्यानें असें सांगितलें कीं, ज्या अर्थी मी आपला चाकर आहें, त्या अर्थी मला आपण सांगाल तें काम केलें पाहिजे. परंतु होळकराच्या घराण्याचा नाश करण्यास माझें खासगी सैन्य मी तुमचे मदतीस देणार नाहीं, असा त्यानें होळकराच्या घराण्याचा बचाव त्या प्रसंगास केला.

दिल्लीचा बादशाहा शाहा आलम आपलें तक्त सोडून इंग्रजाचे लष्करांत त्यांचे आश्रयास जाऊन राहिला होता. त्यास महादजीनें परत आणून तक्तावर बसविला नंतर महादजी व विसाजीकृष्ण कांहीं दिवस दिल्लींतच राहिले होते. पुढें माधवराव बल्लाळ पेशवा मरण पावला ही खबर त्यांस कळतांच प्रथम विसाजी कृष्ण दक्षिणेंत यावयास निघाला. व मागाहून महादजीही निघाला. तों नारायण रावास मारल्याचें वर्तमान त्यास वाटेनें कळलें. नाना फडणवीस व रघुनाथराव या उभयतांचें वैमनस्य पडून दोन पक्ष झाले आहेत. तेव्हां आपण कोणत्या पक्षास मिळावें त्याचा विचार करीत तो इंदुरास आला. इतक्यांत रघुनाथराव पेशवा हा पुण्याकडून इंदुरास महादजीकडे गेला. पण महादजी

इसवी १७७१ / शके १६९३

इसवी १७७२ / शके १६९५

इसवी १७७२ / शके १६९५

त्यास वश झाला नाहीं. तेव्हां तो इंग्रजाकडे गेला. नंतर महादजी पुण्यास येऊन कोल्हापुरास गेला. तेथील राजानें रघुनाथरावास सामिल होऊन पेशव्यांचा कांहीं मुलुख दाबला होता. तो महादजीनें त्याजकडून परत घेऊन सवाई माधवरावास परत दिला.

महादजी कोल्हापुरास असतां, मोरोबा फडणवीस रघनाथरावास पेशवाईचा अधिकार देण्याची मसलत करूं लागला. त्या मसलतीस नाना फडणवीस खेरीज करून बहुतेक होळकरादि सरदार व मुत्सद्दी लोक अनुकूल होते. सवाई माधवराव गादीवर रहावा असें नानाचे मनांत फार होतें, पण तो निराश्रित असल्या कारणानें, त्याचें कांहिं चालेना. तेव्हां तो पुरंदर किल्ल्यावर निघून गेला. ही गोष्ट महादजीस कळली, तेव्हां तो कोल्हापुराकडून नानाकडे थेट पुरंदरास गेला. तो नानास घेऊन पुण्यास आला आणि त्यास राज्याचें काम करण्यास सांगितलें. त्यानें होळकरास रघुनाथरावाचा पक्ष सोडून सवाई माधवरावाचे पक्षांत आणिलें, मोरोबा फडणीसास कैद करून अहमदनगरचे किल्ल्यांत ठेविलें. ह्या प्रसंगीं नानास त्याचें पूर्वपद केवळ महादजीचे आश्रयानें मिळालें असें ह्मटलें पाहिजे.

(इसवी १७७७. शके १६९९.)

(इ. सन १७७८. शके १७००.)

सवाई माधवरावास पेशवाईवरून काढून रघुनाथरावास पेशवा करावा, या हेतूनें इंग्लिश लोक मोठी फौज घेऊन बोरघाट कडून पुण्यास येत आहेत, अशी खबर महादजीस समजतांच तो दाभाड्याचे तळेगांवास पेशव्याचे फौजे बराबर गेला. तेथें इंग्लिशांची व त्याची लढाई झाली. त्यांत इंग्लिशांचा पराभव होऊन, ते महादजीस शरण आले. तेव्हां महादजी त्यास ह्मणूं लागला कीं, जो मुलुख रघुनाथरावापासून सन इसवी १७७३ पासून आजपर्यंत तुह्मीं घेतला असेल तो सवाई माधवरावास परत द्यावा, आणि रघुनाथरावास माझे स्वाधीन करावा. तेव्हां इंग्लिशांचा सेनापति ह्मणाला कीं, असें करण्यास मला अधिकार नाहीं. तेव्हां महादजीनें त्यास विचारिलें कीं, तुह्मास लढाई करण्यास अधिकार असून लढा-

(इ. सन १७७९. शके १७०१.)

ईचे संबंधानें इतर करार करण्यास अधिकार नाहीं ह्मणता हें आश्चर्य आहे, असें त्यानें इंग्लिशांचा सेनाधिपतीस अडविलें. तेव्हां त्यांस असें वाटलें कीं, जर महादजीस राजी ठेवला तरच आपण ह्या प्रसंगांतून निभावून जाऊं; नाहीं पेक्षां आपला बचाव होणें नाहीं. असें मनांत आणून महादजीनें सर्व ह्मणणें त्यानें कबूल करून रघुनाथ रावास त्याचे स्वाधीन केला. आणखी ह्या लढाईंत आह्मी पराभव पावून इतके जेर झालों आहों कीं, पुनः मुंबईस जाण्याची देखील ताकद राहिली नाहीं. इतकें असून महादजी आह्मास मुकत्यानें परत जाऊं देतो, हा त्याचा मोठा उपकार आह्मावर आहे. इंग्लिशानीं गुजराथ प्रांतपैकीं कांहीं आपला मुलुख व एकेचाळीस हजार रुपये नीरख देण्याचें त्यांस कबूल करून शिवाय एक यजित पत्र लिहून दिलें. वर लिहिलेल्या करारांचा उलगडा इंग्रजांनीं निमुटपणें करावा ह्मणून महादजीनें त्यांचे लष्करांतील दोन प्रमुख साहेब ओलीस घेतले, आणि त्यांचे फौजेस परत जाण्यास आज्ञा केली. सारांश इंग्लिशानीं रघुनाथ रावास गादीवर बसविण्यास फार श्रम केले. पण महादजीमुळें ते सर्व श्रम निष्फळ झाले.

नानाफडणवीस महादजीस दबकून असे, त्याच्यावर आपला ज्यास्ती दाब असावा ह्मणून महादजीनें रघुनाथ रावास ह्यातीं धरिला होता त्यानें रघुनाथ रावास १२,००,००० रुपयांची जाहागीर बुंधेलखंडांत देण्या विषयीं पेशव्यांशीं बोलणें लाविलें, आणि रघुनाथराव इतउत्तर पेशव्यांचे राज्यास कोणते तऱ्हेनें त्रास देणार नाहीं अशी रघुनाथ रावाची जिम्मा त्यानें घेतली. रघुनाथ रावावर लोकांची अप्रिती होती, ह्मणून महादजीस त्याच्या स्नेहापासून फारसा नफा झाला नाहीं, ज्याचा लोक त्रास करतात, असल्याशीं महादजीनें स्नेह केला, हें पाहून नानास बरें वाटलें. रघुनाथ रावास जाहागीर देणें पेशव्यांनीं कबूल केल्यावर, लागलेंच महादजीनें त्यास बुंधेलखंडाकडे रवाना केलें. महादजीचे मनांत रघुनाथरावास झांशीचे किल्ल्यांत कैदेंत ठेवण्याचें होतें, असें रघुनाथरा

+ हें पत्र या पुस्तकाचे शेवटी जोडलें आहे.

नर्मदेजवळ आल्यावर, कोणी गुप्तपणें त्यास सांगितलें कीं, महाद
जीचा बेत तुह्मास कैद करण्याचा आहे. तेव्हां पासून तो पाहारे वा-
ल्यावर हल्ला करण्याची संधि पहात होता. चोळी महेश्वराजवळ
नर्मदेस एक पूल आहे. या ठिकाणीं त्यानें पाहारे वाल्यावर हल्ला क
रून त्यांची दाणा दाण केली, व त्यांच्या मुरब्यास घायाळ करून तो
भडोच्यास पुनः आपले इंग्लिश मित्रास शरण गेला.

रघुनाथराव त्या भांतीं जातांच इंग्लिशलोक त्याच्या नावानें त्या
इ. सन १७८० | शके १७०२.
प्रांतांत दंगा करूं लागले. त्यांचे बंदोबस्तास पेशव्यां क-
डून महादजी शिंदा गेला. वडगांव मुक्कामीं इंग्लिशां
नीं दोन साहेब त्यास ओलीस दिले होते. त्यांचे मार्फत तो इंग्लिशां
शीं स्नेहाचीं बोलणीं करूं लागला; परंतु तीं शेवटास गेलीं नाहींत,
आणि कांहीं दिवस उभयतांचें युद्ध चाललें. महादजी गुजराथेंत-
असतां इंग्लिशांनीं त्याचे मुलुखावर हल्ला करून, त्याचा ग्वाल्हेर कि
ल्ला घेऊन, गोहदचा राण्याचे स्वाधीन केला. ही बातमी महादजीस
कळतांच तो तसाच हिंदुस्थानांत जाऊन इंग्लिशांचे पाठीस लागला.
तेणें करून ते फार जेर झाले. एके समयीं तो बेसावध असतां त्याव
वर इंग्लिशांनीं छापा घालून त्याची फार खराबी केली. त्याच्या मुलु
खानजीक रहाणारे जे रजपूत रजवाडे त्यानीं त्याशीं बिघडून आ-
पल्यास मदत करावी, म्हणून इंग्लिश लोक यत्न करूं लागले. गोहद
चा राणा आपल्यास कुमक करील, या आशेनें त्यांनीं त्यास ग्वा
ल्हेरचा किल्ला दिला. तथापि तो राणा व ते रजवाडे लोक शिंद्याशीं
विरोध करण्यास धजावेनात. नंतर महादजीचा आणि इंग्लिशांचा-
तह झाला; त्यांत असें ठरलें कीं, इंग्लिशांनीं आपले मुलुखांत पर-
त जावें, गोहदच्या राण्यास महादजीनें कांहीं उपद्रव करूं नये. आ-
णि त्यानें फौज घेऊन उज्जनीस जावें. दुसरे मराठे लोकांशीं इंग्लि-
श लोक तह करण्यास इच्छित आहेत. त्या कामांत महादजीनें मध्य
स्थ होऊन त्याशीं तह करून द्यावा. मराठे सरदारानीं तह करण्याचें न
ऐकिल्यास त्यांस महादजीनें मदत करूं नये

इंग्लिशांशीं पेशव्यांचा तह महादजीचे विद्यमानें सालपे मुक्का-
इसवी सन १७८२ } मी झाला. त्यांत महादजीची स्वतंत्रता उभयतांनीं कबू-
शके १७०४ } ल केली असून, तो पेशव्यांशीं कधींही स्वतंत्र पणें वागला
नाहीं. ह्या तह झाल्या नंतर इंग्लिशांनीं त्यास वडगांवीं कबूल केल्या-
प्रमाणें भडोच तालुका दिला. इंग्लिश आणि पेशवे त्यांचा पत्र व्यवहा-
र महादजीचे विद्यमानें होऊं लागला. रजवाडे लोक त्यास निमुटप-
णें खंडण्या देऊं लागले. गोहदच्या राण्यानें ग्वाल्हेर चा किल्ला त्याचे
स्वाधीन केला. असा महादजीचा उत्कर्ष होत असतां, दिल्लीचा बाद-
शाहा आपले वजिराचे त्रासानें फार गांजला होता. त्यानें वजिराचें पा-
रपत्य करण्यास त्यास बलाविलें. महादजी बादशाहास आग्र्यास भे-
टला. इतक्यांत तो दुष्ट वजीर मारल्याचें वर्तमान कळलें. तेव्हां बाद-
शाहानें महादजीस वजिरी दिली. ती त्यानें आपल्या नावानें न पतक-
रतां, आपला धनी जो सवाई माधवराव त्याच्या नांवच्या वजीरीच्या
सनदा करून घेतल्या, आणि वकील उलमुतालिक असा किताब पे-
शव्यास देववून, आपण पेशव्यांचा चाकर ह्मणून वजिरीचें काम चाल-
वूं लागला. दिल्ली व आग्रा हे प्रांत बादशाहानें महादजीचे स्वाधीन
केले. आणि त्यानें आपल्यास खासगी खर्चास दर माहा ६५०००-
रुपये देत जावे, असा बादशाहानें ठराव करून घेतला. गोवध को-
णी करूनये, असा एकसाही हुकूम प्रांतांतून बादशाहा कडून त्यानें
प्रसिद्ध करविला होता. कांहीं दिवसांनीं अंतर वेद, आलिगड, आ-
णि राघूगड, त्या प्रांतांत महादजीनें आपला अम्मल बसविला. म-
इ. सन १७८५ } हादजी योग्यतेस चढला, हें ऐकून नाना फडणीस त्या-
शके १७०७ } चा हेवा करूं लागला. त्यास असें वाटे कीं, जशी पेश-
व्यांनीं सातारचे राजकुलाची अवस्था केली, तशी पेशव्यांची अव-
स्था महादजी करील ती न व्हावी ह्मणून तो इंग्लिशांशीं मोठ्या स्ने-
हानें वागूं लागला. कांहीं दिवस पेशव्यांचें व इंग्लिशांचें हरएक-
प्रकारचें बोलणें महादजीचे मार्फत चालत होतें, तें नानानें बंद क-
रून इंग्लिशांचा स्वतंत्र एक वकील पुण्याचे दरबारांत ठेवला. महा-

दजीनें नवीन संपादन केलेल्या दौलतींत पेशव्यांचा भाग असावा, आणि त्यानें पेशव्यांचें महत्व मानावें, ह्मणून नानानें अल्लि बाहादर, व तुकोजी होळकर, त्या दोघांस फौज देऊन महादजीचे हुमाल्यावर दिल्लीस रवाना केले.

दिल्लीचे बादशाहाचा कारभार महादजी करूं लागला, येणेंकरून त्याचे हातीं विपुल द्रव्य लागलें असावें, असा पोकळ लौकीक मात्र झाला. परंतु तेथें बहुत दिवस अव्यवस्था होती, याकारणानें जो पैसा त्यानें तेथील बंदोबस्तास खर्च केला; तो उत्पन्न करण्यास त्यास फारच श्रम पडले. त्यास द्रव्याचा तोटा आला, ह्मणून थोडक्याच दिवसांत त्यानें बादशाहाचे पदरचे लोकांस, ज्या जहागिरी चालत होत्या त्या जप्त केल्या, आणि बादशाहाचे नावें खंडणी मागण्यास आपण जातीनें जयपुरास गेला. महादजीचा डेरा जयपुरास दाखल झाल्यावर, जयपूरकर, व इतर रजपूत रजवाडे त्यांनीं एकत्र होऊन; साठ लक्ष रुपये देण्याचें कबूल केलें. आणि बहुतेक ऐवज त्याचे पदरीं घालून, राहिलेला पैसा अमुक वेळेस देऊं, असा त्याशीं करार केला. जहागिरी जप्त केल्या आणि खंडणी घेतली, त्यामुळें मुसलमान व रजपूत लोक त्याचा द्वेष करूं लागले. तेसमयीं बादशाहाचें परस्वाधीन जीणें होतें. जो कोणी बलाढ्य होऊन त्याचे आयष आराम चालविण्याचें कबूल करी, त्यास तो बादशाहा तत्काल वश होई. त्याप्रमाणें तो बादशाहा आपले पदरचे सरदारांस अनुकूल होऊन, महादजीची निंदा करूं लागला, आणि मुसलमान लोकही रजपुतांस मिळून शिंद्यांशीं लढण्याच्या मसलती करूं लागले. रजपूत लोकांनीं खंडणीचा पैसा देण्याची मुदत केली होती, ती पुरी होतांच महादजीनें आपला सरदार रायाजी पाटील, त्यास तो पैसा त्यांकडून वसूल करण्यास पाठविलें. रजपूत लोकांनीं पैसा न देतां रायाजी पाटिलाशीं लढाई करून त्याचा पराभव केला.

महादजी शिंदा रजपुतांशीं वांकडा झाला, आणि बादशाहा-

इ॰ सन १७८७
शके १७०९

त्याणें देणें होतीं; अशा समयास युद्धावांचून त्यास दुसरा उपाय
राहिला नव्हता. तेव्हां त्यानें दियायन नामें फ्रेंच जातीचा मोठा मरव्या
त सरदार व आपाजी खंडेराव ह्या उभयतांस बोलावून, त्यांचे ह्या
ता खालचीं पलटणें जीं नुकतींच बुंधेल खंडाची स्वारी करून आ
लीं होतीं तीं पलटणें व बादशाहाचें लष्कर घेऊन तो रजपूतांवर चालून गेला.
तो जयपुरास पोहोंचल्यावर त्याचे मनांत रजपूत लो-
कांशीं तह करण्याचें लागून, तो त्या करितां यत्न क-
रूं लागला. पण जयपुराचा राजा प्रताप शिंग यास, दुसरे रजपूत
राजे आप आपलें सैन्य घेऊन, मदत करावयास जमले होते, ह्य-
पून त्या सर्व रजपुतानीं तहाचें बोलणें न ऐकता, व उलटे त्यास-
अनेक प्रकारें उपद्रव करूं लागले. त्यामुळें महादजी शिंद्याची फौ-
ज बेजार झाली. महंमद बेग आबदानी, व इस्मायल बेग, हे दोन
सरदार बादशाहाचे लष्कराचे सेनाधिपती महादजी बरोबर हो-
ते, ते त्याचा पक्ष सोडून रजपूत लोकांस मिळाले. नंतर उभयतां-
ची लढाई सुरू झाली, ते समयीं बादशाहाचें सर्व पायदळ ऐशीं-
तोफां सहित, शिंद्यास सोडून रजपूत लोकांचे सैन्यांत जाऊन मिळाले.

अशा भयंकर प्रसंगांत महादजीनें धैर्य न सोडतां, आपले फौ-
जेची व्यवस्था मोठे गंभीर पणानें केली, ती अशी कीं, त्यानें आप-
ले बरोबरचे लोकां पैकीं कांहीं लोक, व अवजड ओझें, कुशाल ग
डाचे रस्त्यानें ग्वाल्हेरीस रवाना केले; मग आपण लागलाच डीग
येथें गेला आणि आपल्या फौजेच्या सर्व टोळ्या त्यानें परत बोलावल्या.
जाट लोकांस डीग व दुसरे कांहीं महाल त्यांचा स्नेह राखण्या क-
रितां त्यानें परत दिले. आणि भरत पूरच्या किल्ल्यांत त्यानें कांहीं तोफा
ठेऊन, अलीगड, व आग्रा येथील किल्ल्यांवरील लोकांस मदत पा-
ठविली.

ही वरील व्यवस्था, आणि दुसरे किती एक बंदोब-

स करण्यास बराच वेळ त्यास लागला. अशांत रजपुतांनीं लढाई मोठ्या झपाट्यानें चालविली असती तर, त्यांनीं मराठे लोकांस चंबल नदीपर्यंत हटवून टाकलें असतें, परंतु त्यांच्या मनांत मराठे लोकांची सत्ता हिंदुस्थानांत अगदीं नाहींशी करण्याचें नव्हतें; पण महादजीचे मोठे मोठे बेतमात्र सिद्धीस न जावे असें होतें, ह्मणून जेव्हां महादजी डीग एथें गेला तेव्हां रजपूत रजवाडे आप आपल्या ठिकाणीं परत गेले; आणि पादशाहाचा मुलूख घेण्या करितां इस्मायल बेग मागें राहिला तो फौज घेऊन प्रथमतः आग्र्याकडे गेला. महादजी तेथून जवळच होता, पण त्याचे मनांत लढाई करण्याचें नव्हतें. तथापि त्याचे इस्मायल बेगाशीं एकसारखे आबरोज खटके उडत होते, त्यांत उभय पक्षांची बरोबरी झाली, पुढें महादजीस अशी बातमी लागली कीं, झाबितखान रोहिला त्याचा मुलगा गुलाम कादर इस्मायल बेगास साहाय्य करण्यास येत आहे, तेव्हां महादजी तात्काळ ग्वालेरीस परत गेला. त्या समयीं आग्र्याहून ग्वालेरीस येतांना त्याचे बरोबरचे लोक यमुना नदीचे तटाकास लागून ज्या दर्‍या आहेत, त्यांत गचावले. महादजीनें पेशव्यांपाशीं कुमके करितां वारंवार मागणीं केलीं व शेवटीं नाना फडणीसास एक पत्र लिहिलें त्यांतील मजकूर येणें प्रमाणें:— “आपणास कळावें कीं, मी अगदीं निराश होऊन हात टेकीस आलों आहें असें नाहीं, पण मला असें समजलें आहे कीं, इंग्लिश, रजपूत, व मोंगल, हे त्रिवर्ग एकत्र होणार आहेत. तेव्हां हे एक झाल्यावर आपल्या राज्यास केवढा धोका आहे, त्याचा आपण विचार करावा. माझ्या मनांत कांहीं मत्सर नाहीं. आपल्या मनांत कांहीं किंतु असल्यास सोडून द्यावा. होळकर, हरिपंत फडके, परशरामभाऊ पटवर्धन, त्यांच्या विचारा बाहेर मी कधींही वागत नसून, माझे यत्न मराठी राज्याचा उत्कर्ष होण्यासाठीं नेहमी असतात, हें त्यांस माहित आहे. आपला धनी एकत्यानें हित करण्यास आपण सर्वांनीं झटावें. आपले मनांत मज विषयीं कांहीं संशय असल्यास आपण आपले मनांत असा वि-

ऊ, त्यांचा दंगा कोणी मोडला,व इंग्लिशास नळगांव मुक्कामीं कोणी रोकलें,व त्यांच्या कडून तह कोणी करून घेतला. ह्या सर्व गोष्टीचा विचार करून मनांत कांहीं शंका न धरतां,आपले धन्याचें राज्य संरक्षण करण्यास मदत करावी." महादजीनें राणे खान, आपाजी खंडेराव व दि बायन ह्यां बरोबर फौज देऊन आग्र्याकडे पाठविलें. ती फौज आग्र्यास जात असतां इस्मायल बेग,व गुलाम कादर,हे दोन सरदार आपले फौजे सहित शिंद्यांचे फौजेस आडवे झाले. नंतर लढाई झाली त्यांत शिंद्याच्या फौजेचा पराभव झाला.

टिपू सुलतानावर इंग्लिश,व पेशवे लढाई करण्यास जात होते, तेव्हां ह्या मसलतींत महादजीनें अनुकूल व्हावें,अशी इंग्लिशांची इच्छा होती. त्यांस त्यानें असें सांगितलें कीं, माझे पश्चात् माझे हिंदुस्थानांतील राज्यावर कोणी गनिम आल्यास त्याचें निवारण तुह्मीं करावें. मज बरोबर तुमचीं दोन पलटणें पुण्या पर्यंत असावीं; मी रजपूत लोकांशीं लढाई करीत आहें त्यांत मला तुह्मीं मदत करावी. ह्या तीन गोष्टी इंग्लिशानीं कबूल केल्या नाहींत,ह्मणून त्यानें टिपूसुलतानचे मसलतींत सामील होण्याचें नाकबूल केलें. गुलाम कादर व इस्मायल बेग यानीं शिंद्यांचे त्रिवर्ग सरदारांस जिंकून,नंतर दिल्लींत जाऊन तेथील लोकांवर व पादशाहावर फार जुलुम या दोघांनीं केला. इस्मायलबेग व गुलाम कादर हे दिल्लीस जात असतां, आग्र्यास त्यांची व लखोबा दादाची (शिंद्या कडून आग्र्याचा किल्लेदार) लढाई झाली. त्यांत पहिले दिवशीं कोणास जय मिळाला नाहीं, दुसरे दिवशीं गुलाम कादर त्याच्या जहागिरीचे महालांत कांहीं बखेडा झाला होता,त्याचा बंदोबस्त करण्यास निघून गेला,एकट्या इस्मायल बेगानें लढाई दिली. त्यांत तो पराभव पावून सैन्याची बहुत दाणा दाण झाली, नंतर इस्मायल बेग पळून गेला तो व त्याचें सैन्य गुलाम कादरास दिल्ली पाशीं जाऊन मिळालें. आपण बा-

इ.सन १७८८
शके १७१०

दशाहाची कामगिरी केली असें समजून, ते उभयतां राजधानींत जा-
ऊं लागले तेव्हां बादशाहानें त्यास प्रतिबंध केला. मग गुलाम कादरानें
बादशाहाच्या एका विश्वासू चाकरास फितवून, आपला शिरकाव श-
हरांत केला. नंतर त्यानें शहरांतील सर्व वेशींवर व बादशाहाचे जव-
ळ आपले पहारे ठेवून, शहरांत जुलूम व लूट करण्यास आरंभ केला.
असा जुलुमाचा मासला दुसरे इतिहासांत क्वचित ठिकाणीं आढ-
ळेल. हा जुलूम दोन महिने दिल्लींत चालला होता. निर्दय गुला-
म कादरानें वृद्ध बादशाहास+ प्रथम लुटून पदच्यूत केला व शेवटीं
कटार घेऊन त्याचे स्वतः डोळे काढले. बादशाहाचीं मुलें मायासें बा-
हेर काढून, त्यांचे फार हाल व अमर्यादा केली, व किती एकांस त्यानें
उपाशीं मारलें. मराठे लोकांचें सैन्य बादशाहाची व त्याचे माणसांची
सुटका करण्या करितां या समयास येऊन पोहोचलें. इस्मायल बेगा-
चे मनांत नुसता राजवाडा लुटावा असें होतें. पण जेव्हां त्यानें गुला-
म कादराचा हा अघोर जुलूम पाहिला, तेव्हां त्यास त्याचा त्रास घे-
ऊन तो महादजीस जाऊन मिळाला.

शिंद्याचे सरदार व फौज दिल्लींत पोंचतांच तेथील लोकांस फा-
र आनंद झाला, हें गुलाम कादरास कळतांच, तो बादशाहाचा मुलगा
बेदर बखत होता, त्यास बरोबर घेऊन पळून गेला. त्याचे पाठीस शिं-
द्याची फौज लागली, आणि त्या फौजेनें दोघांस मिरत प्रांतांत जिवं-
त धरिलें. महादजीनें गुलाम कादराचे हात पाय तोडून थोटा केला
होता, मग तो थोडे दिवसांत मरण पावला. महादजीनें बेदर बखता-
स कैदेंत ठेवलें, आणि पदच्युत झालेला शाहा आलमास पुनः तक्ता-
र स्थापलें. नंतर गुलाम कादर याची जाहागीर जप्त करून, अंतर-
वेद, दिल्ली, व आग्रा, ह्या प्रांतांत बंडामुळें अव्यवस्था झाली होती, -
ती मोडून त्या प्रांतांत त्यानें आपला अम्मल बसविला. महादजीनें बा-
दशाहाचे मुलुखांतील बखेडा मोडून बंदोबस्त केला. पण येणें करून
याचे अंतःकर्णास स्वस्थता प्राप्त जाहली नाहीं. कारण त्याचे शत्रू-
रजपूत लोकांत पुष्कळ जिवंत होते. पेशव्यां कडून जी महादजीनें कु

+ शाहा आलम.

होती कीं, त्यांनीं शिंद्यास मदत न करतां होईल तितका त्याचा उपमर्द करीत जावा. ते दोघे शिंद्यानें संपादन केलेल्या मुलुखांची वांटणी घेण्या विषयीं फार झटूं लागले. महादजीचे फौजेंत एक गोसावी लोकांचा मेळा होता. त्याचा गुरु हिम्मत बाहादर नावाचा एक गोसावी होता. महादजीनें त्यास मोठी सरदारी देऊन मथुरेस ठेविला होता, तो हिम्मत बहादर महादजीच्या नाशाच्या मसलती करूं लागला. तेव्हां महादजी त्याचें पारपत्य करूं लागला असतां, अल्लि बाहादरानें त्यास पाठीस घालून ते उभयतां बुंधेल खंडांत निघून गेले. अशी स्थिती प्राप्त झाली असतां, महादजीनें जोनपुरावर हल्ला केला, व तेथील राजा बाजीशिंग त्याचा पराभव करून त्यास कैदेंत ठेवला त्या राजानें पूर्वीं जयाजीशिंदे यास ठार मारले होतें, त्याचा सूड उगविण्याचें महादजीचे मनांत होतें परंतु त्यानें त्याची क्षमा करून त्यास जिवदान दिलें आणि त्याज पासून

इ.सन १७९० } अजमीर प्रांत घेतला. अल्लीबहादराचे वर्तणुकेनें महादजीस राग आला त्याचे शांतवनास्तव नानानें त्यास एक पत्र* पाठविलें.
शके १७१२ }

महादजी आपले सैन्यांत प्रथम मराठे लोकांचा भरणा फार बाळगीत होता. हिंदुस्थानांत त्यांच्या करूं लागल्यावर मुसलमान व रजपूत लोक तो आपले फौजेंत भरूं लागला. दोन जातीचे लोक मराठे लोकां पेक्षां जास्ती झाले. हें त्याचे लक्षांत वागत होतें. इतकेंच नाहीं पण, केवळ बाजार बुणगे व अशीक्षित लोकांचे हातून लढाईचें काम चागलें चालत नाहीं, हें मनांत आणून त्यानें आपले फौजेस कवायत शिकविण्या करतां एक दिबायन नामें फराशी सरदार चाकरीस ठेवला. त्यानें चौवीस पलटणें कवाइतींत तयार केलीं. त्या सरदारास दरमहा दाहा हजार रुपये नेमणूक करून पलटणांचे खर्चास शिवाय मुलूख दिला होता. दिबायन साहेबानें आपले हाता खालीं कितीएक फराशी साहेब लोक चाकरीस ठेविले होते. त्यांत सांगस्टर नामें एक फराशी तोफा ओतण्याचे कामांत अत्यंत कुशल होता. त्यानें शिंद्यास-

* ह्याची नक्कल या पुस्तकाचे शेवटीं जोडली आहे.

लहान मोठ्या पुष्कळ तोफा ओतून दिल्या. तेव्हां पासून शिंद्याच्या तो फखान्याचा आणि फौजेचा लौकीक झाला. कवायती फौज बाळगण्याचा पाय मराठे सरदारांत प्रथम महादजीनें घातला. तेणें करून त्याची भरभर विशेष झाली. महादजीनें कार कि र्दीत आग्र्याचा कि ल्ला त्यानें आपली युद्ध सामग्री ठेवण्याची जागा केली होती.

दुसरें कारण महादजीचे राज्याची वृद्धि होण्यास असें झालें कीं, मुसलमान लोकांच्या राज्यास क्षीणत्व येऊन तें राज्य नष्ट होण्याचा समय समीप आला होता. व माधवराव बल्लाळ पेशवा मरण पावल्यावर रघुनाथ राव पेशवाईचे पदाकरता कलह करूं लागला. येणें करून महादजीस आपली सत्ता वाढविण्यास चांगली संधि सांपडली. त्याच्या सत्तेची वृद्धि इतकी जलद होत गेली कीं, नवीन मिळले मुलुखाचा बंदोबस्त करण्यास त्यास सवड सांपडली नाहीं.

पेशव्यांचे दरबारांत व निजामाचे दरबारांत इंग्लिश लोकांचें बरेंच प्राबल्य झालें होतें, तें कमी करावें. व नाना फडणवीसाचे मनांत आपले विषयीं जो हेवा वाटला आहे, तो दूर करावा व तुकोजी होळकर व अलिबाहादर त्यांचा बंदोबस्त करून दिल्लीचे बादशाहा पासून सवाई माधवरावास वजिरीचीं वस्त्रें घेतलीं आहेत तीं त्यास अर्पण करावीं;— इतकीं कामें योजून महादजी पुण्यास यावयास निघाला. आपली दहशत नानास न पडावी व

इ. सन १७९२ } त्यानें कोणा पाशीं कुमक न मागावी म्हणून महादजी-
शके १७१४. } सडा स्वार आवरों लोकांनिशीं प्रथम पुण्यास आला. पण नाना फडणवीस फार संशयी व भितरा होता, ह्मणून त्यानें लोकांची फौज बरीच जमा केली होती. हें महादजीला कळतांच त्यानेही आपली हिंदुस्थानांतील सर्व फौज आणविली. आणि मुला मुठा नद्यांचे संगमा जवळ सैन्या सह जून महिन्याचे बाराव-

इ. सन १७९२ } तारखेस त्यानें आपले डेरे दिले.
शके १७१४ }

नाना फडणीस सवाई माधवरावास असें शिकवूं लागला-

आतां वजीराचीं वस्त्रें आणि महाराज आदिराज हें पद नवीन स्वीकारावें, हे मला उचित वाटत नाहीं. अशा प्रकारें नाना सवाई माधवरावास शिकवीत असतां, महादजीचा फारच आग्रह पाहून सातारच्या राजाची आज्ञा घेऊन माधवरावानें त्या वजीरी च्या वस्त्रांचा आणि पदाचा स्वीकार केला. त्या पदाचा आणि वस्त्राचा स्वीकार करावा कीं न करावा हा विचार आठ दिवस पेशव्यांचे दरबारांत चालला होता, तों पर्यंत नानानें महादजीची गांठ घेतली नाहीं. पुढें जेव्हां स्वीकार करण्याचें ठरलें, तेव्हां शिंद्यानें पेशव्यांस आपले लष्करांत नेऊन मोठ्या समारंभानें वसन्मान पूर्वक तीं वस्त्रें व नवीन पद पेशव्यांस सादर केलें.

जे दिवशीं वकील उलमुतालिक ही पद्वी श्रीमंतांचे नावास जोडली, ते दिवशीं महादजीनें आपलें सर्व लष्कर शृंगारून आपले छावणींत डेरे, राउट्या, तंबू एका रांगेनें उभे केले होते. त्यांत जो मुख्य डेरा होता तो अतिशय सुशोभित करून, त्यांत बादशाहाचे तक्ता सारखें एक उंच सिंहासन करून त्यावर बादशाही सनद व त्या पद्वीचें वस्त्रालंकार मांडिले होते. सवाई माधव राव पेशवा मोठ्या समारंभानें शिंद्याचे छावणींत येऊन त्या डेऱ्यांत गेला. आणि तक्ता पुढें १०१ मोहोरा नजर ठेवून सलाम करून त्या तक्ताचे उजवे बाजूस बसला, तेव्हां शिंद्याचे पदरीं एक पारसनवीस (फारशी भाषा जाणणारा) होता, त्यानें वकील उलमुतालिक अधिकाराची सनद, व गोवधमनाईची सनद अशा दोन संदा वाचून त्यांतील मजकूर लोकांस समजून सांगितला. "दोन शिरपेंच, एक तुरा, एक जोड फजबंद, कुडक्या, शिकबाळी, व कडी तोडे, एक कलमदान, एक मोरतब, व दोन मोरचेलें, एक पालखी, नालखी, घोडा, ढाल, तलवार, आणि एक हत्ती," इतके पदार्थ पेशव्यास महादजीनें दिले, ते स्वीकारून नवीन पोषाख व अलंकार घालून सवाई माधवराव पुनरपि, त्या तक्ता सन्निध पे-

ऊन बसला. तेव्हां महादजी शिंदे व नाना फडणवीस वगैरे मुत्सद्दी
व सरदार जे त्या दरबारांत होते, त्यांनीं पेशव्यास नजरा दिल्या. नंतर
पेशवा पुण्यांत माघारा येत असतां, वाटेनें महादजी पेशव्यावर मो-
रचेल उडवीत होता. नालखींत बसून सवाई माधवराव शहरांत आला,
ते वेळेस शहरांतील रहिवासी लोक तो थाट पहाण्यास फार जमले हो
ते. व शहरांत जय शब्दाचा घोष जिकडे तिकडे ऐकूं येत होता. तोफां-
च्या सरबत्या व वाद्यांचा गजर जिकडे तिकडे चालत होता. असा था-
ट व ऐश्वर्य पुण्यांतील लोकांनीं शहर वसल्या पासून पाहिलें नव्हतें.

पेशव्यास उलमुतालीक पदाची सनद मिळाली, त्यांत असें
लिहिलें होतें कीं, दिल्ली मध्यें बादशाहाचा कारभार करण्यास पेशव्या
चे तर्फे, महादजी शिंदा किंवा त्याचा कोणी वंशज असावा. सवाई मा-
धवराव शिंद्याचे डेऱ्यांतून आपले वाड्यांत येतांच, त्यानें त्या महाद
जी शिंद्यास बादशाहाच्या कारभाराचीं वस्त्रें दिलीं. त्यावेळेस त्या
स मोठी योग्यता प्राप्त झाली असतां, पेशव्यास मुजरा करून, तो एका
बाजूस उभा राहिला. पेशव्यानें त्यास मानकरी लोकांत बसावयास
सांगितलें, तेव्हां त्यानें आपले बगलेंतून पेशव्याचा जोडा काढून-
विनंती केली कीं, मी आपला जोडा उचलणारा चाकर, व मला पाटील
या नांवा पेक्षां दुसरें मोठें नांव योग्य नाहीं. असें बोलून पेशव्याचा
अतिशय आग्रह पाहून, तो त्या सरदार लोकांत बसला. महादजी-
राणोजी शिंद्याचा विदुर पुत्र ह्मणून लोकांत त्याची प्रतिष्ठा नव्हती,
परंतु माधवराव पेशव्यानें त्याचें विदुरत्व मनांत न आणितां त्याचा
स्वदेशाभिमान, अक्कल आणि पराक्रम पाहून त्यास पाटीलकीचे व
तनास आणि सरदारीस अधिकारी केला. महादजी पेशव्याचे दरबा-
रांतून आपले लष्करांत परत आल्यावर त्याचे पदरचे लोकांनीं त्या-
स नजरा दिल्या.

नालखीचा समारंभ जाहाल्यावर फाल्गुन वद्य १४ शके १७१५
या दिवशीं पुण्यांत रंगाचा समारंभ मोठा जाहला. शनवारचे वाड्यां
त रंग व गुलाल गोटे तयार केले होते, शहरांतील थोर थोर ग्रहस्था-

नीं आप आपले घरीं रंग तयार करून, सवाई माधवराव पेशव्यास-आपले घरीं रंग घेण्यास बोलाविलें होतें. हरिपंत तात्या फडके व-महादजी शिंदे या दोघांकडे मात्र रंग घेण्यास, सवाई माधवराव गेला होता. शिंद्याचे छावणीतून महादजी व सवाई माधवराव आपले परिवारासह रंग खेळत शनवारच्या वाड्यांत आले. शहरांत स्वारी आली तो रात्र पडली. तेव्हां दारु उडवीत पेशव्याची स्वारी शनवारच्या वाड्यांत शिंद्या सहवर्तमान गेली. रंगाचे पाट रस्त्यानें वाहात होते असा रंग पुण्यांत पूर्वीं कधींही जाहला नाहीं. सवाई माधवराव व महादजी शिंदे उभयतां मरण पावल्यावर, पेशवाईचा बेरंग जाहला मग रंग होण्याची आशा राहिली नाहीं.

नाना फडणवीस महादजी पाशीं त्याचे एकंदर मुलुखाचा व-स्वारीचा हिशेब मागूं लागला, ते समयीं तो त्यास ह्मणूं लागला कीं; मी मोठा यत्न करून दिल्लीची वजीरी, पेशव्यां करितां मिळविली त्यास जो खर्च मी केला आहे तो तुह्मी सरकारांतून मला द्यावा. हिशेबाची वादावाद पेशव्याचे दरबारांत कांहीं दिवस चालली होती, तोंपर्यंत नाना व महादजी एकमेकांशीं निष्कपटानें वागत होते. महादजीचा आणि सवाई माधवरावाचा एकांत न व्हावा, ह्मणून नानानें बराच बंदोबस्त ठेवला होता. त्यानें पेशव्यास शिकारीचा छंद लाऊन त्यास आपले बरोबर घेऊन तो रानांत जाऊं लागला. नानाची कदर फार सक्त असे त्यामुळे सवाई माधवराव त्यास भिऊन वागत होता, हें महादजीस मशरूल न वाटून तो पेशव्यास नानाचे कचाटींतून सोडविण्याची मसलत करूं लागला. तो नाना सारिखा स्वभावानें त्रासीक नसून त्यानें भाषण व वागणूक फार सरळ होती. येणें करून त्या तरुण पेशव्यानें मन सहज शिंद्याकडे वळूं लागलें. महादजी सवाई माधवरावास कांहीं उपदेश करीत होता, असें वर्तमान नानास कळलें. तेव्हां त्यानें पेशव्यास एकांतीं गांठून विचारलें कीं, त्यानें आपले लष्करांत फराशी लोक चाकरीस ठेऊन आपले फौजेस तो कवाईत शिकवीत असतो, त्याचा वेतन ब्राह्मणास रसातळास घालून आ-

पण मुख्य व्हावें असा दिसतो. याजकरितां जर तुह्मीं त्याचे मसलती-
नें वागाल तर, मी चाकरी सोडून घरीं बसेन आणि तुमचें राज्य बुडेल. अ-
शी विनवणी डोळ्यांस पाणी आणून त्या नानानें माधवरावाची केली.
आणि त्याचें मन आपलेकडे आकर्षण केलें. इकडे हिंदुस्थानांत तुको-
जी होळकर व शिंद्याकडील दिबायन फ्रेंच सरदार त्यांची कांहीं का-
रणावरून लढाई झाली. त्यांत होळकराचा पराभव झाला. तो सूड घ्या-
वयास होळकरानें शिंद्याचें राजधानीचें उज्जन शहर लुटलें.

मोरचे पंत सचिव लहान ह्मणून त्याचे दौलतीचा कारभार क-
रण्यास नानानें बाजीराव मोरेश्वर त्यास नेमला होता, त्यास दूर क-
रून महादजीनें सचिवांस स्वतंत्र अधिकार दिला. तसेंच गोविंदरा-
व गायकवाड बडोद्याचे गादीस योग्य वारस असतां, त्यास त्या सं-
स्थानावर न नेमतां दुसरा वारस* नेमण्याची योजना नानानें केली हो-
ती; ती महादजीनें फिरवून गोविंदरावाची स्थापना बडोद्याचे गादी-
वर केली. येणेकरून महादजीची लोकांत वाहावा झाली खरी, पण
नानाचें आणि त्याचें वैमनस्य वाढून कलह उत्पन्न झाला. त्या कल-
हापासून मोठा अनर्थ झाला असता; पण हरिपंत फडक्यानें मह-
त् प्रयासानें तो कलह मिटविला. पेशव्याचे दरबारांत इंग्लिश लोकां-
चें आगमन होण्यास प्रथम रघुनाथराव कारण झाला खरा, नंतर म-
हादजीचे प्रयास्तव नानानें त्या लोकांचें प्राबल्य विशेष वाढविलें. दोघां-
चा कलह लागला असतां तिसऱ्यास लाभ होतो, त्या ह्मणी प्रमाणें
सालपीचे मुक्कामीं जो पेशव्यांचा व इंग्लिशांचा तह झाला, त्यांत पे-
शव्याची शिंद्यावरील धनीपणाची सत्ता नाहींशी झाली, आणि महा-
दजीस स्वतंत्रता प्राप्त होऊन, त्याचे दरबारांत इंग्लिशांचा वकील रा-
हूं लागला. हा लाभ इंग्लिश लोकांनीं आपल्यास करून दिला, असें
तो जाणत होता; परंतु त्या लोकांचा फैलाव विशेष न व्हावा म्हणून तो
फार सक्त होता. त्यास दिल्लीचा अधिकार प्राप्त झाल्यावर त्यानें बं-
गाल प्रांताची चौथाई सरदेशमुखी इंग्लिशांपाशीं मागितली, तेव्हां
त्यांनीं तुमचें मागणें बरोबर नाहीं असें त्यास उत्तर दिलें. पुढें त्याचे-

---

* मानाजी गायकवाड.

मनांत बंगाल प्रांतावर हल्ला करावयाचा होता, पण नाना त्यास कुम-क करीनासा झाला, व इंग्लिशांनीं महादजीशीं सख्य ठेवून असें सांगि गिनलें कीं, तुमचे दिल्लीचे कारभारांत आम्हीं हात घालणार नाहीं; म्ह-णून ती त्याची मसलत तशीच राहिली.

शिंद्याचें मुख्य राजधानीचें ठिकाण त्याकालीं उज्जनी शहर होतें. तेथें महादजी कधीं कधीं जाऊन राहात असे. तेणें करून मा ळव्यांत स्वस्थता, बंदोबस्त चांगला होता. त्या शहरापासून जे प्रांत फार दूर होते, तेथें धांदल व अव्यवस्था अतिशय होती. ती मोडून आपल्या राज्याचा बंदोबस्त करून ते बळकट पायावर स्थापावें; नानाचें महत्व कमी करून, इंग्लिशांशीं आपले कवायत शिकलेले फौ-जेचे दोन हात व्हावे; असे त्याचे मनांत पुष्कळ बेत होते. परंतु ईश्वरा-नें त्याचें आयुष्य कमी केल्यामुळें वर लिहिलेले बेत सिद्धीस गेले ना-हींत. महादजीस मोठा ज्वर येऊन पुण्याजवळ वानवडी गांव आहे ते-

इ. सन १७९४ } थें तारिख १२ फेब्रूआरी रोजीं मृत्यु पावला. ते दिव-
शके १७१६ } शी माघ शुद्ध त्रयोदशी होती.

महादजी शरीरानें स्थूळ व काळा होता; तो फार उंच किंवा ठेंगणा नसून मध्यमसर पुरुष होता. त्याचा पाय अधू असल्या मु-ळें त्यास साफ चालतां येत नव्हतें. त्यास लिहितां वाचतां येत असून जमा खर्चाची चांगली माहिती होती. तो दिसण्यांत अंतःकरणाचा-निर्मळ, भव्य, आणि साधा पुरुष असे, आणि त्याची मुखश्री सदा-आनंद युक्त असे; येणें करून त्यास पाहून लोकांस सहज आनंद-होई. त्याची वागणूक अगदीं साधी असून, लोकांनीं त्यास राव, अ-मर महाराज न म्हणतां, पाटील म्हणत जावें अशी त्याची फार इच्छा होती. तो पेशव्यांकडे आला म्हणजे चाकर म्हणून त्याचा जोडा उच-ली. खेडे गांवीं गेला म्हणजे पाटील म्हणून चावडींत जाऊन बसे; या शिवाय आपला राज्य कारभार चालवून दिल्लीची वजीरी चालवी असे. राजा, वजीर, पाटील, आणि उजऱ्या, हे चार हुद्दे परस्परां अगदीं विरुद्ध असतां त्याचा तो एकमेकांशीं विरोध न येऊं-

देतां चालवीत होता.

लोकांची स्थिति व मतें काय आहेत, व त्यांवर जुलूम काय होत आहेत व कोणते उपायानें त्यांचें दुःख निवारण होऊन त्यास सुख होईल, हें कळण्यास लोकांत मिसळून वागल्या शिवाय दुसरें साधन त्या काळीं नव्हतें, ह्मणून त्यानें असें मनांत आणिलें कीं, आपण ग्रामाधिकारी ह्मणजे पाटील झाल्यानें सर्वांची दाद लागण्यास व लोकांचें हार्द्र कळण्यास फार सुलभ मार्ग होईल असें समजून त्यानें पुष्कळ गांवची पाटिलकीची व देशमुखीचीं वतनें खरेदी केलीं होतीं. तसेच पेशव्यांचे कानावर एखादी गोष्ट घालून तत्काल बंदोबस्त करीन ह्मटलें तर, हुजऱ्याचे द्वारा सारिखें त्या काळीं दुसरें सुलभ द्वार नव्हतें. ह्मणून तो हुजऱ्याचे पेशानें पेशव्या सन्निद्ध राहून, कितीएक लोकांचीं रास्त कामें कारभारी लोकांचे अनुमता शिवाय परभारी उलगडून घेत होता.

महादजीचें ऐश्वर्य त्या काळीं इतकें अमर्यादीत झालें होतें कीं, तो मराठे लोकांत फार बलाढ्य झाला होता इतकेंच नाहीं; परंतु हिमालया पासून कन्या कुमारी पर्यंत त्याशीं स्पर्धा करण्यास कोणी ही समर्थ राहिला नवता. दिल्लीचा बादशाहा त्याचे अंकित झाला होता. इकडे पेशव्यांचे दरबारांत त्याचे निस्पृह वर्तणुकीचें तेजपडून, नाना फडणीस तर अगदींच दिपून गेला. आणि पेशव्यांचे दरबारांत बहुतेक कामें महादजीचे मसलतीनें चालत असत - त्याची सत्ता, राज्य व ऐश्वर्य इतकें विस्तीर्ण झालें असतां, त्याचें वर्तणुकेंत यत्किंचित् फेरफार न होतां तो फार लीनतेनें वागत होता ह्मणून लोकांस तो प्रिय झाला होता.

महादजीनें राजधर्म व प्रजा धर्म यांचें उत्तम रीतीनें पालन करून, परस्परांचा कधीं विरोध न येऊं देतां सर्वांचे हक्क सारखे चालविले. जिवा पेक्षांही परम प्रिय अशीं जीं लोकांचीं वतनें, त्यांचें संरक्षण करून जमिदार लोकांस स्वतंत्र त्यानें ठेविलें होते. यवनी व हिंदु धर्माचे विद्या मोपळ्या प्रमाणें विरुद्ध असतां, गोवधाची-

दुर्दैवा मुळें त्यास मृत्यूनें गाठिलें; येणें करून त्याचें मरण आबाल वृद्धांस दुःख दायक झालें.

पुष्कळ आणि पोकळ डौल करणें त्यास अगदीं आवडत नव्हतें. त्यास पाटील बाबा अथवा महादजी पाटील असें लोक म्हणत असत. त्यानें कधींही आपल्या जिलबेस दोनचारसे मनुष्यें चालविलीं नाहींत. व आपल्या ऐश्वर्याची मिरवणूक विना कारण लोकांस दाखविली नाहीं. वानवडीहून कामा निमित्त पुण्यांत येणें झाल्यास तो घोड्यावर बसून दोनचार माणसानिशीं शहरांत येत असे. दिल्लीचा बादशाहा जरी पिंजऱ्यांतील पोपटा प्रमाणें त्याचे स्वाधीन होता, तथापि त्यास यत्किंचित् दुःख न देतां त्याचा इतमाम त्याचे योग्यते प्रमाणें त्यानें ठेविला होता. होळकर जरी नाना फडणीसाचे मसलतीनें वागून त्याशीं स्पर्धा करीत होता, तथापि त्या घराण्याशीं महादजीचा जो सख्य भाव होता, त्यांत त्याणें अंतर आणिलें नाहीं. आपल्यास ऐश्वर्य प्राप्त झालें ह्मणून पेशव्यांशीं जो त्याचा सेवक धर्म होता, तो सोडून तो कधींही त्याशीं उद्धट पणें वागला नाहीं. मध्य हिंदुस्थानांत रजपूत संस्थानिकांवर खंडण्या बसवून, सर्वांची राजकीय स्वतंत्रता त्यानें नाहींशी केली होती; तथापि ते जातीचे क्षत्रिय असले कारणानें, आपले ठिकाणीं जाती संबंधानें अतिशय श्रेष्ठत्व मानून, महादजीस नीच मानीत होते. तें सर्व सहन करून त्यांचे मनोदयानुरूप त्यांशीं वर्तन ठेवून त्यास त्यानें सुप्रसन्न ठेविलें होतें. होळकर व नाना फडणीस कांहीं तरी कारण काढून, महादजीशीं कलह करण्यास वारंवार बरदलीस येत होते, पण आपसांत भेद न व्हावा ह्मणून; तो वक्त पाहून कधीं कधीं आपलें नुकसान करून त्यांशीं सख्य ठेवीत होता.

मराठे लोकांत कलह उत्पन्न कधीं होईल, आणि आम-

चा पाय त्यांचे राज्यांत कधीं शिरेल, या आशेनें इंग्रज व फ्रेंच लो-
क काकदृष्टीनें मराठे लोकांचे न्यूनत्व त्या काळीं पहात होते. प-
रंतु आपसांत ऐक्य राखण्याची महादजीची दक्षता पाहून, ते
निराश होऊन आचंबा करीत असत. टिपू सुलतानाशीं लढाई
करून, इंग्रजांस कर्नाटक प्रांत निर्वेध करून द्यावा, ह्मणून फार
दिवस मसलत पेशव्यांचे दरबारांत घाटत होती; परंतु महादजी
नें ती मसलत आपले हयातींत सिद्धीस जाऊं दिली नाहीं. तो रा
ज्यनीतींत इतका प्रवीण होता कीं, त्याच्या प्रमाणें त्याकाळीं मस
लती, धैर्यवान, राज्यधुरंधर, दुसरा कोणी मुत्सद्दी नवता असें-
ह्मटलें तरीं चालेल. स्वराज्यापासून नफा कोणता, व परराज्या पा-
सून तोटा कोणता, हें महादजी चांगलें समजत होता. एवढेंच ना-
हीं, पण त्यानें यत्न करून परस्थ लोकांचा हात आपले राज्यांत-
शिरूं दिला नाहीं. पेशव्यांचे राज्यांत जें इंग्लिश लोकांचें प्राबल्य-
होत गेलें, तें केवळ नाना फडणीसाचे भित्रे स्वभावानें झालें, असें
ह्मटलें पाहिजे. नानास असें वाटूं लागलें कीं, महादजी प्रबळ
झाला आहे, तो पेशव्यांचें राज्य बुडवील ह्या भास्तीनें त्यानें इं-
ग्रजांचा आश्रय केला.

नाना फडणीसास आपल्या शिवाय दुसऱ्याचें वर्चस्व अग-
दीं सहन होत नवतें हें प्रसिद्ध आहे. व त्यानें त्या दुष्ट बुद्धीनें मोठ-
मोठे सरदार लोकांस जेर केलें होतें. तो कधीं कधीं महादजीचा उप
मर्द करून, त्यास वाईट वाटण्या जोगत्या कांहीं गोष्टी करी, तथापि त्या
चा विषाद मनांत वागवून महादजी त्याचे नाशास प्रवृत्त झा-
ला नाहीं, यावरून महादजीचे अंगीं क्षमा, व औदार्य बुद्धि, हे गु-
ण धर्मराजा प्रमाणें होते, असें ह्मटलें तरीं शोभेल, कारण जर
नानाचा सूड उगविण्याचें त्यानें मनांत आणिलें असतें, तर त्यानें
तें सहज केलें असतें. परंतु सवाई माधवराव लहान, अशा प्रसं
गीं नानाच्या नाशास आपण झटूं लागलों असतां, पेशव्यांच्या रा-
ज्यास अपाय होईल, हें समजून महादजीनें मनांत विकल्प आ

आत्म हितावर नजर दिली नाहीं, इतकेंच नाहीं, पण जेथें आपलें नुकसान होऊन एकंदर मराठी राज्यास हितावह होईल, असा प्रसंग येई, तेथें आपलें नुकसान ही करून घेण्यास, महादजी कधीं ही मागें सरला नाहीं. त्यास कविता करण्याचा छंद असून त्याणें पुष्कळ अभंग, पदें, केलीं आहेत ह्मणून ऐकण्यांत आहे. तसेंच तो रोज कांहीं वेळ समाधी लाऊन देवाचें ध्यान करीत असे, आणि दररोज भागिरथीचें पाणी पीत होता असें ह्मणतात.

महादजी स्वभावानें दयाळू, निस्पृह आणि दृढनिश्चयी असून नीतिवान् होता. त्यास असत्य भाषण करणें, विश्वास घात, व्यभिचार वगैरे दुर्गुणाचा मोठा तिरस्कार होता. तो सदाचरणी असून भाविक भक्ता प्रमाणें विरक्त वागत असे. तो स्वधर्मनिष्ठ असून देव ब्राह्मणावर त्याची फार भक्ति होती. तो मनाचा इतका गंभीर होताकीं, कसेंही अरिष्ट प्राप्त झालें असतां, अथवा कसाही उत्साह प्राप्त झाला असतां, त्याचें चित्त व्यग्र होतनव्हतें. ऐश्वर्य, संपत्ती, आणि राज्य, मनुष्यास प्राप्त झालीं असतां, त्या ऐश्वर्याचे झोंकांत मनुष्यें निमग्न होऊन धुंद होतात, असा साधारण नियम आहे. परंतु वर लिहिल्या सर्व गोष्टी महादजीस अनुकूल असतां, त्यास उन्मत्तता अगदीं आली नाहीं.

जस जशी त्याची सत्ता वाढत गेली, तस तसे त्याच्या अंगीं क्षमा, सत्य, नम्रता, औदार्य, हे गुण वृद्धिंगत होत गेले. तो मोठा मसलती, धूर्त, शूर, व स्वदेशाभिमानी होता, आणि लोकांची स्थिति, काल व प्रसंग पाहून दूर दृष्टीनें वागत होता, येणें करून लहान थोर सर्व लोक त्यास चाहात होते, आणि लोकांस त्याचें मोठें भूषण वाटत होतें. मराठे लोकांत पुष्कळ सरदार होऊन गेले, त्यांत महादजी प्रमाणें पुरुष फार थोडे आढळतील. शिंद्याचे कुलांत राणोजी पासून ऐश्वर्य, राज्य, आणि संपत्ति हीं प्राप्त होण्यास आरंभ झाला, त्याची शिकस्त महादजीनें केली. जसा चितारी चित्र-

काढते समयीं प्रथम खाका तयार करतो, नंतर त्यांत रंग भरला-
ह्मणजे तें चित्र सुशोभित दिसूं लागतें. तसा राणोजीनें राज्य स्था
पन करण्याचा खाखा मात्र तयार केला होता आणि महादजीनें तें
राज्य स्थापून वृद्धिंगत केलें, आणि आपले कुळाचा पराक्रम व
यश जगांत सूर्य किरणा प्रमाणें प्रकाशित केलें. तें महादजी-
चा अंतकाल होतांच अदृश होऊं लागलें.

महादजी पुण्या जवळ दोन कोशांवर वानवडी गांव आहे ते-
थें आपले छावणींत मरण पावला. त्याचा कलतान शिंगर नावा-
चा एक बसावयाचा घोडा होता, तो घोडा व एक तरवार त्याच्या फ-
कीर गुरूनें त्यास दिली होती, ती तरवार दौलत राव लष्करांत घेऊ
न गेला; आणि घोडा महादजीचे समाधी पाशींच ठेविला होता. त्या
घोड्या वर कोणी बसत नवते. तो घोडा इतका समंजस होता कीं,
ठाणा वरून सोडला ह्मणजे आपो आप आपले धन्याचे समाधीस
प्रदक्षिणा करून मुजरा करीत होता. तो घोडा जिवंत असतां व मे
ल्यावरही नवसास पावत होता असें सांगतात. तो मेल्यावर-
त्या जागीं दुसरा घोडा शिंदे सरकारानी आणून बांधला आहे तो स
माधीचा घोडा समजून त्यावर कोणी बसत नाहीं नेहेमी ठाण बंद-
असतो.

महादजीची समाध एकाद्या गरीब मनुष्याचे समाधी प्रमाणें
एका छपरांत आहे. महादजीचा पराक्रम आणि कीर्ती त्यास माहि
त आहे त्यास ही गरीब समाधी पाहून दुःख वाटल्या वांचून कधींही
राहाणार नाहीं. कैलासवासी जनकोजी शिंदे यांणीं त्या समाधी
करितां मोठें देवालय बांधण्यास आरंभ केला, ती इमारत पुरीत हो
तां अर्धीच पडली आहे. त्या समाधीस पाटील बाबाची छत्री ह्म
णतात. छत्रीचे दररोजचे पूजा नैवेद्यास, व वार्षिक भंडाऱ्याचे ख-
र्चास, सुमारें साडेतीन हजार रुपयांची शिंदेसरकारांतून नेमणुक
आहे. भंडारा प्रतिवर्षी माघ शुद्ध १३ स होतो तेदिवशीं मुक्त द्वार
असतें. सर्वजातीचे लोकांस भोजनास मिळतें. स्वयंपाक तयार-

[illegible] ब्राह्मण वगैरे इतर जातीस भोजनास घालतात. सारांश या भंडाऱ्यांत ब्राह्मणा पेक्षां मुसलमान फकीराचा ज्यास्त मान आहे.

---

# भाग ३ रा.

## सन इसवी १७९५ शालिवाहन शके १७१७ पासून सन इ. १८२७ शा. शके १७४९ पर्यंत.

## दौलतराव.

—०००—

महादजीच्या तीन स्त्रिया* होत्या त्यांस औरस संतती कांहीं जाहाली नाहीं. महादजीचा सखा भाऊ तुकोजी होता तो पानिपतचे लढाईंत मरण पावला. केदारजी, रवळोजी, आणि अनंदराव असे तुकोजीचे तीन पुत्र महादजीनें आपलेजवळ बाळगले होते. अनंदरावाचा मुलगा दौलत राव होता त्यास मी दत्तक घेईन असें महादजी जिवंत असतां ह्मणत होता हा त्याचा मनोदय त्याचे पदरचे लोकांस ठाऊक होता. महादजीचे मरणा+ नंतर दौलत रावाचे दत्तविधानाबद्दल जेव्हां वाटावाट चालू झाली, तेव्हां त्यास दत्तक घेऊंनये असें महादजीचे स्त्रियांचें ह्मणणें पडलें; परंतु तुकोजी होळकर व नाना फडणीस यांनीं दौलत रावास महादजीचा मुलगा ह्मणून मान्य केल्यावर स्त्रियांची हरकत जागचे जागीं राहिली. मी तुमचा मानमरातब व बंदोबस्त चांगला ठेवीन, असें दौलतरावानें आपले मातोश्रीस सांगितलें तेव्हां दत्तविधानास स्त्रियांनीं हरकत केली नाहीं. पेशव्याचे परवानगीनें दत्त‡विधान झालें, ते समयीं दौलतरावाचें वय पंधरा वर्षाचें होतें.

---

* १ लक्ष्मी बाई. २ भागिर्थी बाई. ३ तिसरीचें नाव समजलें नाहीं.

\+ शके १७१५ माघ शुद्ध १३ बुधवारीं मरण पावला. शके १७१६ ह्मणून मरणशक पूर्वी लिहिला आहे ती चूक आहे.

‡ दत्तविधानाची शक मिति समजत नाहीं तथापि महादजीचे मरणानंतर लागलेंच दत्तविधान झालें असावें असें वाटतें.

शके १७१७.‡ बर गेला होता. पेशवे आणि निजाम यांत लढाई खड्यां‍चे मुक्कामी होऊन पेशव्यास जय मिळाला आणि निजामाकडील मुख्य प्रधान मश्रुल्‌मुलुख कैद करून पुण्यास पेशव्यानें आणिला; नंतर पेशव्याचे फौजेंतील सर्व सरदार आप आपले ठिकाणीं निघून गेले. हा जय पेशव्यास केवळ आपले अकलेचे जोरावर मिळाला असें नाना फडणीसास वाटून तो सवाई माधवराव पेशव्यास फार जाच करूं लागला. त्या त्रासानें सवाई माधवरावानें शनवारचे वाड्यातून उडी टाकून आपण त्याग केला. त्यास औरस संतती नवती तेव्हां राज्यास कोण मालक करावा, या मसलतीसाठीं नाना फडणीसानें शिंदे, होळकर, पटवर्धन, भोंसले या सर्व सरदारांस पुण्यास बोलाविलें.

बाजीराव, चिमाजी आपा हे दोन औरस आणि अमृतराव दत्तक असे रघुनाथ बाजीरावाचे तीन पुत्र शिवनेरचे किल्ल्यांत नाना फडणीसानें कैदेंत ठेविले होते. बाजीराव सर्वांत वडील हा आपली मदत होऊन आपल्यास राज्याधिकार मिळावा ह्मणून यत्न करीत होता. पण सर्व सरदार मुत्सद्दी यांचे विचारांत असें ठरलें कीं, रघुनाथराव व त्याचे पुत्र लोकांस अप्रिय आहेत येवढेंच नाहीं पण हे इंग्लिश लोकांचे परममित्र व पक्षपाती आहेत. या कुळांत पेशव्याचें राज्य गेलें असतां, इंग्लिशांचे हातीं राज्य दिल्यासारखें होईल, या करितां या कुळांत अधिकार न देतां सवाई माधवरावाचे बायकोचे मांडीवर दत्तक देऊन राज्यावर स्थापन करावा. हा विचार ठरल्यावर सर्व सरदार आपले जाहागीर मुलुखांत परत गेले.

दौलतराव नगर प्रांतांत जामगावांस निघून गेला. बाळोबा तात्या व जिवबा दादा बक्षी असे दोन मुख्य मुत्सद्दी दौलतरावाचे प-

---

† तारिख १९ मार्च सन इसवी १७९५ मिति फाल्गुन वद्य ९ शके १७१६.

‡ तारिख २५ अक्टोंबर सन् १७९५ मिति आश्विन शुद्ध १२ शके १७१७

द्रीं होते. दौलतराव अज्ञान असल्या कारणानें शिंद्यांचे राज्याचा सर्व कारभार या दोघांचे हातीं होता. पेशव्याचे राज्यास दत्तक घ्यावा न घ्यावा, या वादावादींत बाळोबा तात्या व जिवबा दादा आपले लाह्मन धन्यास बरोबर घेऊन जात होते, तेसमयीं बाळोबा तात्यानें असें सांगितलें कीं, बाळाजी विश्वनाथ पेशव्याचा औरस वंश कायम असतां राज्यावर दत्तक स्थापन करणें बरोबर नाहीं; तेव्हां जिवबादादानें असें सांगितलें कीं, दौलतराव अज्ञान आहे त्याचें मत तुकोजी होळकरास अनुसरून असलें पाहिजे. अशा रीतीनें बाळोबा तात्याची शंका जिवबा दादानीं मोडून दत्तक घ्यावा असें मत दौलतरावाकडून प्रथम त्या उभयतां कारभाऱ्यानीं देवविलें.

बाळोबा तात्यानें आपला पक्ष स्वीकारला होता, हें वर्तमान बाजीरावास समजलें, त्यानें त्याचे हातून दौलतरावास वश करण्याचा यत्न आरंभला. जिवबा दादा आजारी पडून त्यास जगण्याची आशा राहिली नाहीं; तेव्हां त्यानें आपले मरणापूर्वी दौलतरावास बोलाऊन असें सांगितलें कीं, पेशव्यांचे घराण्यांत औरस वंश असतां आपण दत्तक घ्यावा म्हणून अभिप्राय प्रथम दिला तो बरोबर नाहीं, बाळोबा तात्याचे मताप्रमाणें आपण औरस वंशाचा अभिमान धरावा हें वर्तमान नाना फडणीसास कळलें, त्यानें परशराम भाऊ पटवर्धनास तास गांवाहून तांबडतोब पुण्यास बोलाविला, तो दोन दिवसांत येऊन नानास भेटला. बाळोबा तात्या बाजीराव रघुनाथास पेशव्याचे राज्यावर स्थापण्याची मसलत करणार, ती त्याचे अगोदर आपण शेवटास न्यावी असें नाना फडणीसाचे व परशराम भाऊचे विचारास येऊन भाऊनें बाजीराव रघुनाथास कैदेंतून सोडून आणिला.

दौलत रावानें आपल्यास पेशवाईचे पदावर स्थापन केल्यास त्यास चार लक्षांचा नवीन मुलुख देईन, व या कृत्यास त्याचे फौजेची मदत लागल्यास तिचा खर्च मी देईन, असा बाजीरावानें गुप्त करार दौलत रावाशीं केला होता. बाजीराव पुण्यास आल्यावर-

चा मिलाफ झाला, हे बाळोबा तात्यास वाईट वाटून पेशव्याचे रा-
ज्यावर बाजी रावाची स्थापना होऊनये, अशी उलट मसलत तो क-
रूं लागला. त्यानें दौलतरावास सर्व सैन्य घेऊन पुण्यास बोलावि
ला. बाळोबा तात्यानें आपलें वैमनस्य आहे तो आपल्यास कैद
करील या भीतीनें नाना फडणीस आपला कारभार सोडून पुण्या
तून जाऊं लागला. त्यास परशराम भाऊनें पुष्कळ धीराच्या गोष्टी
सांगून शेवटीं असें सांगितलें कीं, बाळोबा तात्याशीं लढाई आपण
करूं. बाजीराव रघुनाथाच्या स्वभावाचा नाना फडणीसास भरव-
सा लागे ना, तेव्हां परशराम भाऊस पुण्यांत बाजी रावा जवळ राह
ण्यास सांगून नाना सातान्यास निघून गेला.

सन इसवी १७९६. } शके १७१८. } बाळोबा तात्याचे बोलावण्यावरून दौलत राव
आपलें सर्व सैन्य घेऊन पुण्यास आला नंतर बा-
जीरावाची गांठ पडली तेव्हां फौजेचे खर्चास कांहीं रोख पैसा बा-
ळोबा मागूं लागला. बाजीरावानें मज जवळ तूर्त पैसा नाहीं ह्म-
णून सांगितलें, तेव्हां बाळोबा तात्याची त्यावर वक्रदृष्टी जाहली.
त्यानें चिमाजी आपास सवाई माधवरावाचे बायकोचे मांडीवर दत्तक
देऊन चिमणाजी माधवराव नाव ठेविलें आणि त्यास पेशवाईचीं व-
स्त्रें सातान्याहून आणून तारिख २६ मे शके १७१८ वैशाख वद्य
चतुर्थी रोजीं पेशव्याचे राज्यास मालक केला. या मसलतींत नाना
फडणीस, परशरामभाऊ पटवर्धन व बाळोबा तात्या हे त्रिवर्ग असू-
न ही मसलत बाजीरावास कळली नवती. चिमाजी आपा बाजी
रावाचे मर्जी विरुद्ध पेशवाईचा अधिकार चालविण्यास नाखुष
होता. परशराम भाऊ बाळोबा तात्याचे सांगण्या वरून पेशव्याची
रिवापगिरी करूं लागला. बाजीराव रघुनाथ शिंद्याचे हातीं बंदीवा
ना सारखा होता, त्यास हिंदुस्थानांत कैदेंत ठेवावा असें बाळोबा ता
त्यानें योजलें होतें.

शिंद्याचे व बाळोबा तात्याचे मसलतीनें नाना फडणीस व बाजीराव हे उभयतां आप आपले अधिकारास मुकून अज्ञात वास काढित होते, ते दोघे सम दुःखी असल्यामुळें त्यांचा गुप्त पत्र व्यवहार चालत होता. शिंद्याचे पदरीं रायाजी पाटील व मानाजी फांकडे असे दोन सरदार होते, त्यांचें वजन दौलतरावावर चांगलें होतें. रायाजी पाटलाचें आणि बाळोबा तात्याचें वैर होतें. मानाजी फांकडा रघुनाथराव पेशव्याचा परम दोस्त होता, त्याणें बाजी रावाचा पक्ष स्वीकारला होता. बाजीराव दौलत रावाचे छावणींत प्रतिबंधांत असतां नाना फडणीस त्यास फौज नवीन ठेवण्याकरितां पैसा पाठवूं लागला. मानाजी फांकडा बाजीरावास अशी सल्ला देऊं लागला कीं, कांहीं फौज जमा जाहाली ह्मणजे आपण आपला यत्न सिद्धीस नेऊं. शिवनेरचे किल्यांत बाजीराव कैदेंत असतां बाळोजी कुंजिराचा बाजी रावाशीं चांगला स्नेह जाहाला होता. बाजीरावास राज्य प्राप्त व्हावें या कामास तुह्मीं मदत करण्यास अनमान करूंनका, ह्मणोन बाळोजी कुंजीर नाना फडणिसाचें आर्जव माहाडास जाऊन करीत होता.

नाना फडणीसानें रायाजी पाटलाचे हातून दौलत रावाकडे असें बोलणें चालविलें कीं, तुह्मीं बाळोबा तात्यास कैद करून बाजी रावास पेशव्याचे राज्यावर स्थापन करावा. अहमदनगरचा किल्ला, परशराम भाऊ पटवर्धनाची जाहागीर, असा १० लक्षांचा नवा मुलुख बाजीराव या मदती बद्दल तुह्मास देईल. ही रदबदली सखाराम घाटग्याचे हातून नाना फडणीसाने रायाजी पाटलाकडे चालविली होती. बाजीराव कांहीं फौज जमाकरून आपले नाशास प्रवर्त होणार आहे व त्यानें आपले नाशाची कांहीं मसलतही चालविली आहे हें वर्तमान बाळोबा तात्यास समजलें. चिमाजी आपा राज्यावर बसल्या पासून बाजीराव शिंद्याचे छावणींत राहात होता, त्याचा मान धन्या प्रमाणें बाळोबा तात्यानें दौलत रावाचे हातून कांहीं दिवस ठेविला होता. पण जेव्हां बाजी रावाचें कृत्रिम

कोल्हापुराजवळ कागळ नावाचा एक गांव आहे तेथें सखाराम घाटगा एक मराठा राहात होता. त्याचे कुळास सरजेराव असा किताब मुळापासून होता. सखाराम आणि येशवंतराव घाटगे या उभयतांत कांहीं वतनाचा तंटा लागला. त्यांत सखाराम हरला. मग तो परशराम भाऊ पटवर्धन याजपाशीं शिलेदारीचे चाकरीस राहिला. नाना फडणीसाचे तैनातीस सखाराम घाटगा शंभर स्वारांचे पथकाची सरदारी चालवीत होता. नाना फडणीस पुण्यांतून पळल्यावर घाटग्याचे पथक दौलतरावाचे निसबतीस गेलें. सखाराम घाटग्या हुषार व आर्जवी होता या मुळें रायाजी पाटलाचा त्याजवर लोभ होता. घाटग्याची मुलगी फार सुरेख आहे ती आपल्यास बायको करावी ह्मणून दौलतरावाची ही सखारामावर कृपादृष्टी होती. बाजीरावाचे पक्षास दौलतरावानें अनकूल व्हावें ह्मणून सखारामाचे हातून नाना फडणीसानें यत्न चालविला होता. रघोजी भोंसले, होळकर, निजाम अल्ली, कंपनी सरकार या चौघास बाजीरावाचे पक्षास नाना फडणीसानें गुप्त पणें अनकूल करून घेतले होते.

बाजीरावाचे हितास्तव नाना फडणीसानें बाळोबा तात्याचे नाशाकरितां जें जाळें पसरले होतें, त्याची खबर बाळोबा तात्यास नवती. जेव्हां ही खबर त्यास समजली तेव्हां त्याणें त्या जाळ्याचा आरोप बाजीरावावर घातला, आणि त्यास शिंद्याचे छावणीतून काढून हिंदुस्थानांत पाठवावा असा बेत केला. बाजीरावास घेऊन जाण्या करितां जी फौजेची तुकडी नेमिली होती तिचा मुख्य अधिकारी सखाराम घाटग्यास नेमिला होता. सखाराम घाटग्या पुण्यातून बाजीरावास घेऊन हिंदुस्थानांत निघाल्यावर बाजीराव वाटेनें त्याचें परोपरीनें आर्जव करूं लागला. "मला दक्षणेंतून बाहेर नेऊं नको. मज करितां तूं दौलतरावापाशीं रदबदली कर आणि मला रा-

ज्यावर स्थापण्याचा यत्न कर, मी तुझे उपकार विसरणार नाहीं. तूं आपली मुलगी जर दौलत रावास देऊं करशील, तर, तूं जें ह्मणशील तें तो सर्व कबूल करील. आपण घाटग्याचे वंशांतील, आपली मुलगी कण्हेर खेडचे पाटलाचे घराण्यांत कशी द्यावी, या अभिमानानें सखाराम घाटगा प्रथम बरेच आटेवेढे घेत होता, पण बाजीरावाचा आग्रह पाहून त्यानें दौलतरावास आपली मुलगी देण्याचें कबूल केलें. तुह्मास पेशव्याचा अधिकार मिळाल्यांवर तुह्मीं दोन कोट रुपये दौलतरावास द्यावे. मला माझे कागल गांव इनाम करून देऊन दौलत रावाची दिवाण गिरी द्यावी, त्या तीन कलमा बद्दल जर तुह्मीं मला वचन द्याल, तर मी आपली मुलगी दौलत रावास देईन. बाजीरावानें त्याचे तिन्ही करार कबुल केले. नंतर बाजी रावाची मसलत बिघडली असा बाहाणा करून प्रवरा नदीचे कांठीं केशव गोविंदाचे पिंपळगांवास सखाराम घाटग्यानें मुक्काम केला.

पेशव्याचे फौजेंतील सुमारें दहा हजार मनुष्याची टोळी साल

इ॰ सन १७९६ शके १७१८. त्याचे घांटाकडे बाजीराव आमचा धनी आहे म्हणून उपद्रव करीत होती. बाळोबा तात्या, परशराम पंत भाऊ आणि मश्रुल मुलुख हे तिघे बाजी रावाचे पक्षाचे सैन्याचा मोड करण्याची मसलत करीत असतां, तारिख २७ अकटंबर रोजीं दौलतरावानें बाळोबा तात्यास कैद केला. परशराम भाऊस धरण्याची मसलत चालू असतां त्यास अगोदर खबर समजली, तेव्हा तो चिमाजी आपा पेशव्यास बरोबर घेऊन शिवनेरी कडे पळाला त्याचा पाटलाग करून त्यास पकडल्यावर अनंदराव रास्ते याणी परशराम भाऊची जिमा घेऊन त्याची कैद चुकविली.

परशराम भाऊ व बाळोबा तात्यास कैद करावे, ही मसलत नाना फडणीसानें व बाजीरावानें करून दौलत रावाचे हातून अमलांत आणविली. दौलत रावानें बाजी रावास पुण्याचे गादीवर स्थापन करण्या करितां परत बोलाविला, तो कोरेगांवास येऊन बसला. बाजी रावाचा पक्ष धरून जी फौज साल्याचे घांटात जमली होती, त्यांत

सतां बाजीरावानें एक पत्र त्यास पाठविलें, त्यावरून त्याचे मनांत संश
य येऊन त्यानें बाजीरावास असें लिहून पाठविलें कीं, आपले मनांत
मजविषयीं कांहीं किंतु असेल तर, मला कारभाराची गरज नाहीं मी
कारभार सोडून स्वस्त काशिवास करण्यास जाईन. बाजीरावानें त्यास
अभय दिल्यावर, नाना फडणीसानें निजाम अली व दौलतराव शिंदे
या दोघांशीं, बाजीरावास राज्यावर बसविण्या करितां जो तहनामा
केला होता, त्यांत आम्हीं नानाफडणीसास पुनरपि दिवाणगिरीवर
कायम करूं असें दोघां कडून त्यानें स्वतः बद्दल बाहादारीचें कलम
लिहून घेतलें होतें. नाना फडणीस, बाजीराव या उभयतांची पर
स्परां विषयीं खात्री जाहाल्यावर, तारिख २५ नवंब (कार्तिक वद्य १
रोजीं नाना फडणीस पुण्यास येऊन दिवाण गिरीचें काम पाहूं लागला.
नंतर बाजीराव रघुनाथास पेशवाईची वस्त्रें तारिख ४ दिर्जबर (मार्ग
शीर्ष शुद्ध ५ रविवार) रोजीं प्राप्त होऊन तो पेशवा ह्मणून राज्यका
रभार चालऊं लागला. चिमाजी आपाचें झालेलें दत्तविधान अशास्त्र आ
हे अशी शास्त्री मंडळीची संमत्ती पडली. तेव्हां तो पेशव्याचे पदावरू
न दूर झाला इतकेंच झालें नाहीं पण त्या बिचाऱ्यास प्रायश्चित्त घ्या
वें लागलें

बाजीरावास पेशवाईचा अधिकार प्राप्त झाल्यावर त्यानें शिं
(इ. सन १७९७ / शके १७१९.) द्याशीं करार केल्या प्रमाणें त्यास अहंमदनगरचा किल्ला
व त्यालगत कांहीं मुलुख दिला, आणि परशराम भाऊ
चा जाहागीर मुलुख तुह्मास संधी सांपडेल तसा घ्यावा ह्मणून त्या
नें त्यास परवानगी दिली. रघोजी भोंसल्याशीं जो नाना फडणीसा

---

† अमुक गोष्ट सशास्त्र किंवा अशास्त्र असें मत सांगणें हें मोठे जोखमीचें आणि विचाराचें
काम आहे. सतेच्या अथवा द्रव्याच्या बळानें शास्त्री लोक हवें तसें मत देतात यामुळें त्याचे धंद्यास
मूल्यता राहात नाहीं ज्या शास्त्री लोकांनीं हें दत्त विधान प्रथम सशास्त्र म्हणून सांगितलें होतें
तेच शास्त्री पुनः त्या दत्तविधानास अशास्त्र ह्मणूं लागले हा चमत्कार नव्हे काय?

नें करार केला होता त्यावर बाजीरावानें आपली मरखलाशी केली, नं-
तर तो नागपुरास निघून गेला. निजाम अल्लीशीं जो नानानें तहना
मा केला होता, तो बाजीरावकबूल करीना तेव्हां त्याचा प्रधान मश्रुलमु
लुख रागाऊन हैदराबादेस निघून गेला.

तुकोजी होळकर नाना फडणीसाचा पक्षपाती होता, तो याच
वेळेस मरण पावला, त्यास काशीराव, मल्हारराव हे दोन औरस,
व येशवंतराव, आणि विठोजी हे दोन विदुर पुत्र असे चार पुत्र होते.
काशीरावांस राज्याधिकार चालविण्याची शक्ती नवती, ह्मणून मल्हा
रराव राज्यावर मालकी करूं लागला, त्यास येशवंतराव आणि विठो-
जी मिळाले. काशीराव आणि मल्हारराव यांत कलह उत्पन्न जाह
ला, तेव्हां मल्हारराव आपले विदुर बंधुसह नाना फडणीसाचे आ
श्रयास भांबुर्ड्यास येऊन राहिला. काशीरावानें मल्हाररावास धर
ण्या करितां दौलतराव शिंद्या कडे मदत मागितली, ती घेऊन त्यास-
धरण्या करितां तो गेला, त्यांत उभयतांची लढाई होऊन मल्हारराव
मरण पावला, तेव्हां येशवंतराव नागपुरास आणि विठोजी कोल्हापु
रास पळून गेला. मल्हाररावाचा लहान मुलगा खंडेराव दौलतरा-
वानें कैदेंत ठेविला, आणि काशीरावास होळकराचे घराण्यातील स
रदारी वर स्थापन केला. कुलाब्याचे संस्थानावर मानाजी आंग्र्या हो-
ता, त्यास कैद करून तें संस्थान दौलतरावानें आपला आस बाबुरा
व आंग्र्यास दिलें. होळकर आणि आंग्रे या दोन सरदारांच्या वर लि
हिलेल्या घाळमेळी नाना फडणीसाचे अनुमता वांचून दौलतरावा
नें केल्या. पेशव्याचे राज कारभारांत दौलतराव ढवळा ढवळ करूं
लागला, हें नाना फडणीसास पसंत वाटलें नाहीं. नानाचे मसल-
तीनें, आणि दौलतरावाचे मदतीनें, बाजीरावास पेशवाईचा अधि-
कार प्राप्त झाला हें समजून तो दोघांचा मिंधा होता. त्याचें काम-
झाल्यावर तो दोघांचे कांचा पासून मुक्त होण्याचे उपाय योजूं ला-
गला.

कार्या पुरतें आर्जव आणि कारणा पुरती मैत्री ठेवीन, स्वतः

कोणतेही कामा विषयीं निश्चय,व धैर्य नसून,दुसऱ्याचे तंत्रानें चाल वयाचें नाहीं,दुसऱ्यावर भरवसा ठेवावयाचा नाहीं आणि सर्व दुन स मी फसवीन,अशा संकल्पानें जे मनुष्य आपलें आचरण ठेव तात त्याचा आरंभ कदाचित चांगला होत असेल,पण परिणाम- नेहमी वाईट होतो. बाजीराव जन्मापासून कैदेंत होता,तेथुन सु टला तो लागलाच राजा झाला;त्याचे स्वभावाची पारख कोणास- जाहाली नाहीं, त्यास राज्य प्राप्त झालें ते समयीं जे सरदार मुख्य ही जवळ होते ते त्याचे बापाचे वैरी होते,यामुळें त्याचा कोणावर वि श्वास न बसतां जिकडे तिकडे त्यास विश्वास घात आणि दगा भा सूं लागला. कोणी मनुष्य दुसऱ्यावर भरवसा न ठेवतां आपला एख दा धंदा चालवीन ह्मणेल तर,चालत नाहीं. इतकेंच नाहीं पण कधीं क धीं आपले शत्रूचे माडीवर देखील आपली मान ठेवण्याचे त्यास धै र्य करावें लागतें. बाजीरावाचे अंतःकरणाचा धर्म कोणास समजत नाहीं,व त्याचे स्वभावाची परिक्षा कोणास जाहाली नाहीं किंवा करत आली नाही,यांतून जें ह्मणावें तें शोभेल.

नाना फडणीसा सारखा शाहाणा पण त्यास त्याचे अंतःक रणाची खोली रुंदी समजली नाहीं मग दौलतराव शिंद्यास कळली असेल ही शंका देखील घ्यावयास नको. नाना फडणीस व दौलत रा बाजीरावानें आपले तंत्रानें चालावें ह्मणून दोघे इलाज करीत होते पण दोघाचे हातावर तुरी देण्याची मसलत तो करीत होता,हें उभ यतांसही बरेंच दिवस समजलें नाहीं. दौलतरावानें हिंदुस्थानात जावें,आणि नाना फडणीसानें कारभार सोडून द्यावा, ही मसलत- त्यानें प्रथम योजली. सखाराम घाटग्यास सर्जेराव पद देऊन त्यास असें सुचविलें कीं, नाना फडणीस जोंपर्यंत कामावर आहे,तों पर्यं त तुला शिंद्याची दिवाणगिरी तो प्राप्त होऊं देणार नाहीं;या करितां त्याची उचल बांगडी केल्या वांचून तुझें कार्य सिद्धीस जाणार नाहीं- असें बाजीरावानें त्यास सांगितलें.

सर्जेरावाचे मुलीचे आमीषानें दौलतराव त्याचे ओंजळीनें पा

णी पिऊं लागला, जुने कारभाऱ्यांचें कांहीं चालेना, सर्व कामें त्याचे मसलतीनें चालूं लागलीं. नाना फडणीस कैद करावा ही मसलत बाजीरावानें सर्जेरावास सूचविली, तारिख ३१ दिजंबर रोजीं दौलत रावाचे भेटीकरितां वानवडीस नाना फडणीस गेला होता, तेथें त्यास सर्जेरावानें कैद करून अहंमद नगरचे किल्यांत पाठविला. आणि त्याचे पक्षाची व त्याचे तर्फेचे लोकांचीं घरें जप्त करून सर्व मालमत्ता त्यानें नेली.

नानाचे नाशाची मसलत शेवटास गेल्यावर बाजीरावानें अमृतरावास आपला दिवाण केला, नंतर ते दोघे दौलतरावास आणि सर्जेराव घाटग्यास पुण्यांतून काढून लावण्याची मसलत करूं लागले. बाजीरावास राज्याधिकार प्राप्त होण्यापूर्वीं त्यानें दोघांशीं जे कांहीं करार केले होते ते उलगडल्या वांचून ते त्याचा शह सोडिनात. सर्जेरावानें आपली मुलगी* दौलत रावास देण्याचा जो नाद फार चालविला होता, तो लग्न ⁂ समारंभ उभयतांनीं मोठा खर्च करून हौसेनें पुण्यांत केला. दौलत रावाचे फौजेस दरमाहा वीस लक्ष रुपये पगार द्यावा लागत होता, लग्नास खर्च मनस्वी जाहाल्याकारणानें त्याचे फौजेच्या पगाराची तलफ चढली, ते व्हांनो दोन कोट रुपये देऊं केलेले बाजीरावा पाशीं मागुं लागला. त्यानें दौलत रावास असें सांगितलें कीं, मज जवळ तुह्मास देण्यास पैसा नाहीं, परंतु जर तुह्मीं सर्जेरावास आपला दिवाण कराल तर, तो बाळोजी कुंजिराचे माहितीनें पुण्यातील श्रीमान लोकांकडून पैसा उकळून तुमची भरती करील. ही सूचना त्यास मान्य होऊन त्यानें आपले सासऱ्यास दिवाण केला.

सर्जेराव स्वभावानें निरदय व क्रूर होता. त्यानें शहरांतील कितीएक लोकांस मारा हाण केली कित्येकास राखेचे तोब्रे देऊन मिर

(इ. सन १७९८ — शके १७२०.)

---

* मुलीचें नांव बायजा बाई.

⁂ सन इसवी १७९८ चे मार्च महिन्यांत ह्मणजे शके १७१९ चे फाल्गुन महिन्यांत हें लग्न झालें मिति कोणाती होती ती समजत नाहीं.

\+ पौष शु. १३ शके १७१९ सन इसवी १७९७ ता. ३१ दिजंबर रोजीं नाना फडणीस कैदेंत सांपडले.

त्याच्या धुऱ्या दिल्या, कोणास तापले तव्यावर उभें केलें, कोणास तोफेचे तोंडीं बांधून उडविलें असे अनेक प्रकारचे जुलूम चालवून तो लोकांचें वित्त हरण करूं लागला. तो बाजीरावाच्या नाकचा बाल आणि दौलतरावाचा सासरा, यामुळें त्याचे जुलुमास पारावार नाहींशी जाहली. किती एक लोक त्या जुलुमानें मेले, किती एक घरें सोडून पळून गेले. गंगाधर पंत भानुस* तापले तोफेवर बांधला तेणें करून तो मरण पावला. शहरांतील व्यापार धंदा सर्व बंद होऊन जिकडे तिकडे मारामार रडारड ऐकुं येऊं लागली. सर्जेरावाचा अघोर जुलूम पाहून बाजीरावास देखील त्याचा द्वेष उत्पन्न जाहला, पण त्यास त्यानेंच परवानगी दिली होती ह्मणून प्रतिबंध करतां येईना; अमृतरावास बाजीरावाचे अनुमतानें हें कृत्य चालले आहे हें ठाऊक नव्हतें. तो बाजीरावाकडे येऊन ह्मणु लागला कीं, शहरांत दौलतरावानें व त्याच्या सासऱ्यानें काय प्रळय मांडला आहे, आणि त्याची डोळेझाक करून तुह्मीं स्वस्थ बसलां आहां हें मला आश्चर्य वाटतें. मी शिंद्यास कैद करून हा बखेडा एका क्षणांत मोडतों, बाजीरावानें त्याचे मसलतीस अनुमोदन देऊन, दौलतरावास भेटीस वाड्यांत बोलाविला आणि त्यास रागाऊन विचारूं लागला कीं, "तूं माझा चाकर आहेस किंवा धनी आहेस हे मला समजत नाहीं." दौलतराव हात जोडून ह्मणाला कीं, मी आपला सेवक आहें तेव्हां बाजीराव ह्मणाला कीं, तूं व तुझे पदरचे सरदारानीं माझे पदरचे माणसावर व रयतेवर, अनेक प्रकारचे जुलुम करून माझा उपमर्द चालविला आहे तो मला सहन होत नाहीं त्याकरितां तूं येथून निघून जामगांवास† जा. दौलतरावानें उत्तर केलें कीं मी आपले आज्ञे प्रमाणें जामगावास जाण्यास तयार आहें, परंतु माझे फौजेचा पगार कांहीं महिन्याचा मी देणें आहें, तो दिल्या

---

* नाना फडणीसाचें आडनाव भानु होतें. गंगाधरपंत त्याचा भाउबंद होता.

† पुण्याजवळ वानवडी, नगर प्रांतीं जामगांव, खानदेशांत बऱ्हाणपुर, आणि माळव्यांत उज्जनी इतके ठिकाणीं शिंद्याचीं ठाणीं होतीं.

वांचून फौज येथून जाणार नाहीं, व आपल्यास राज्यावर स्थापन करण्या करितां मी लोकांचें कर्ज काढून जो खर्च केला आहे त्या कर्जाचा निकाल जाहाल्या खेरीज सावकारमला जाऊं देणार नाहींत, ही माझी पेशाची अडचण दूर करावी, ह्मण जे मी पाणी पिण्यास देखील येथें राहात नाहीं. हें दौलतरावाचें आणि बाजीरावाचें भाषण होत असतां इतक्यांत अमृतराव आला, आणि त्याणें दौलतराव धरून कैद करूं कीं काय? ह्मणून बाजीरावास पूर्वीचे संकेता प्रमाणें नेत्र संज्ञेनें विचारलें, तों हुकूम देण्याची त्याची छाती होईना तेव्हां त्याणें नको ह्मणून सांगितलें, दौलतरावास त्या दोघांचा संशय येऊन तो वानवडीस निघून गेला. बाजीरावानें दौलतरावास सांगितलें कीं, अमृतरावाचे मनांत तुजविषयीं कांहीं विकल्प उत्पन्न होऊन तो तुजला धरण्याचे मसलतींत आहे, यास्तव तूं फार सावध असावेंस. बाजीरावाचे अंगीं स्वतः भांडण्याचें धैर्य नसून दुसऱ्याची कलागत लावण्याचे कामांत तो फार कुशल होता. अमृतराव आणि दौलतराव या दोघांत त्याणें वैमनस्य उत्पन्न केल्यावर ते एकमेकांशीं वैर भावानें वागूं लागले.

नाना फडणीसास जेव्हां बाजीरावानें शिंद्याचे हातून कैद करविला, तेव्हां नानाचे पक्षांतील सर्व लोकांस काढून टाकावें असें त्यांचे मनांत होतें. सातारचे राजे सातारचे किल्यांत पेशव्याचे कैदेंत होते, त्याचे बंदोबस्तास नानाफडणीसाचे वशिल्याचा बाबुराव कृष्ण ह्मणून एक कारकून होता, त्यास कैद करून किल्यांत तुह्मीं आपला अम्मल बसवावा, असें बाजीरावानें राजास सांगितलें होतें, त्या प्रमाणें राजानें किल्ला आपले ताब्यांत घेतला. तेव्हां दौलतरावास असें वाटलें कीं, बाजीराव राजास अनकूल करून आपला नाश करील. नंतर दौलतरावानें राजास अशी मसलत दिली कीं, सर्व राज्याची मालकी तुमची असतां, तुह्मास कैदेंत ठेऊन पेशवे राज्य हांकतात हें चांगलें नाहीं; तुह्मीं या ब्राह्मणांचे बंदांतून मुक्त व्हा व याचा कांहीं यत्न कराल तर, मी आपली फौज तुमचे मद

तीस देईन. राजाचा भाऊ चतुर्शिंग भोंसला होता त्याणें दौलतरावा-चे मुलखावर बंड उभें केलें, तें मोडण्या करितां पेशाव्या कडून माधव राव रास्ते गेले होते, त्याचे हातून बंडाचा उपशम होईना, तेव्हां परशराम भाऊ पटवर्धन रास्तेयांचे कैदेंत होता, त्याणें बाजी रावास असें सांगून पाठविलें कीं, मला आज्ञा कराल तर मी जाऊन हें बंड मोडतों. बाजीरावानें त्यास बंदमुक्त करून बंडावर पाठविला त्यानें बंड मोडून चतुर्शिंग भोंसल्यास कोल्हापुरास पिटून लावला.

दौलत रावाचें दत्तविधान होण्या पूर्वीं त्याणें महादजी बावा-सन इ. १७९८ चे स्त्रियांशीं अशी कबुलायत केली होती कीं, मी तु-शके १७२० ह्मास योग्य नेमणूक करून तुमचा चांगला बंदोबस्त करून देईन, त्या प्रमाणें त्यानें केलें नाहीं. तिघी स्त्रिया त्याचे छावणीत राहात होत्या त्यांस जी नेमणूक होती ती त्यानें कमी केली, ह्मणून तिघी नाखुष जाहल्या होत्या. तिघींत जी लहान होती ती रूपानें फार लावण्य होती, तिशीं दौलत राव जातो असा आरोप+ दोघी वडील सवतींनीं तिजवर घातला आणि त्या उघडपणें आपले सवतीची आणि दौलतरावाची निंदा करूं लागल्या. सर्जेराव घाटगा त्याचे समजुती करितां त्याचे डेऱ्यास गेला, पण त्या त्याचें तोंड पाहीनात. शेवटीं बलात्कारानें तो त्यांचे डेऱ्यांत शिरला आणि जरबंदानें त्या बायास त्याणे बांधून मार दिला.

बाळोबा तात्यास कैद करून सर्जेरावास दिवाण केला, हें दौलत रावाचे पदरचे जुने मुत्सद्दी लोकांस पसंत वाटत नवतें. महादजीचे कारकीर्दी पासून शिंद्याचे दरबारांत शेणवी लोक बरेच भरले होते, त्यांस सर्जेरावाची उन्मत्तता आणि बायांचा झालेला अपमान सहन होईना, तेव्हां त्याणीं बायांचा पक्ष स्वीकारिला. शेवटीं बायांनीं बऱ्हाणपुरास राहावें आणि त्यांचे खर्चाची योग्य नेम

+ ह्या आरोप खरा किंवा खोटा याची माहिती आह्मास नाहीं परंतु ग्रांट साहेबाचे इंग्लिश इतिहासाचे तिसरे भागांत पृष्ठ १६२ याचे आधारावरून लिहिला आहे.

णूक दौलतरावानें करून द्यावी, असा ठराव जाहला. बाया तारिख १४ मे रोजीं पुण्याहून ब्रम्हाणपुरास जाण्याकरितां निघाल्या, त्यांचे बंदोबस्तास जी फौजेची टोळी दिली होती तीचे अधिकाऱ्यास बायास अहंमदनगरचे किल्यांत नेऊन ठेवाव्या, ह्मणून दौलतरावाचा गुप्त हुकूम होता. कोरेगांवचे मुकामीं हें वर्तमान बायांस समजलें, तेव्हां त्यांचे पक्षांतील शेणवी लोकानीं त्या फौजेंतील मुजफरखान नांवाचा एक पठाण वश केला. त्याणें त्या टोळीची दाणादाण करून बायांस सोडवून पुनः पुण्यास परत आणिल्या. नंतर त्याणीं दौलतरावाचे छावणी नजीक आपला डेरा लाविला.

बायाचें बंड मोडावें म्हणून सर्जेरावाचा फार आग्रह होता; पण या कृत्यांत आपला दुर्लौकीक होऊन कदाचित् आपली सर्व फौज त्यांचा पक्ष स्वीकारील, या संशयानें दौलतरावाचा रुकार मिळेना. मुजफरजंग बायांस घेऊन अमृतरावाकडे जात असतां त्याचे पाठीस सर्जेराव लागला होता, त्याचा पराजय त्या पठाणानें केला. आणि बायांस खुषरूप नेऊन अमृतरावाचे लष्करांत पोंहचविल्या. हें लष्कर जुन्नरचे रस्त्यास भीमेचे कांठीं होतें. बाजीराव बायांस आंतून फूस देतो असा लौकीक त्या वेळेस जाहला होता. त्यानें इंग्रज सरकारचे रेसिडेंटास* सांगितलें कीं, तुम्ही मध्यस्थ होऊन दौलतरावाची आणि बायांची समजुत घालावी. दौलतरावानें रेसिडेंटाची मध्यस्थी नाकबूल केली.

आपले फराशी सरदार बरोबर कांहीं सैन्य देऊन अमृतरावाचे लष्करावर हल्ला करावयास ता. ७ जून रोजीं दौलतरावानें एक टोळी पाठविली. या लढाईंत तो सरदार पराजय पावून परत आला; तेव्हां पुनः तहाचें बोलणें अमृतरावाकडे दौलतरावानें चालविलें. त्यांत असें ठरविलें कीं, बायानीं आपले इच्छेस येईल ते ठिकाण राहण्यास पसंत करावें, मी तेथें त्यांचे गुजाऱ्याची तजवीज

---

* करनल पालमर पेशव्यांचे दरबारांतील इंग्रजांकडील रेसिडेंट.

त्यांचे मर्जी प्रमाणें ठेवीन. असा ठराव जाहल्यावर अमृतराव आपलें सैन्य व बायांस घेऊन खडकीस घेऊन पोंहचला. तेथें तो अगदींच सावध असतां ता. ११ जून रोजीं मोहरमची दाहावी तारीख होती. त्या दिवशीं ताबुतांच्या गर्दीचा बंदोबस्त ठेवण्या करितां, सर्जेराव घाडगा, काहीं सैन्य व तोफा घेऊन संगमावर आला होता. त्याणें एकाएकीं अमृतरावाचे लष्करावर तोफा चालू केल्या तेणें करून त्याचे सैन्याची दुर्दशा होऊन गेली.

या प्रसंगांत बाया सांपडल्या नाहींत, त्या विठ्ठलवाडीस जाऊन राहिल्या होत्या. अमृतरावाचे लष्करावर सर्जेरावानें हल्ला केल्या पासून पेशव्यांत आणि शिंद्यांत लढाई सुरू होण्याचा प्रसंग आला. शिंद्यांशीं लढण्या करितां निजामअली व रघोजी भोंसला यांशीं बाजिरावानें तहाचें बोलणें चालविलें, तेव्हां टिपुसुलताना कडे शिंद्यांचे वकील तह ठरविण्यास गेले; परंतु शिंद्यांची मसलत शेवटास गेली नाहीं. फौजेचा पगार थकल्या मुळें फौजेंतील लोक दौलतरावाचे दारांत धरणें घेऊन बसण्याचे विचारांत होते. पेशाची ओढ, बाजिरावाशीं वैमनस्य पडलें, बायानीं दगा केल्या मुळें त्यांचे परस्पर लोकांत दुफळी जाहली. अशीं संकटें प्राप्त होतांच दौलतराव अगदीं गांगरून गेला. त्यास कांहीं सुचेना तेव्हां याणें पेशव्यांचे दरबारांतील रेसिडेंटास[+] बायांचे कामांत मध्यस्थ घातला; पण बाया त्याचें कांहींच ऐकेनात.

बाजिरावास दहशत बसण्या करितां नाना फडणिसास कैदेंतून सोडण्याचा विचार दौलतरावानें केला. नाना पासून दहा लक्ष रुपये घेऊन त्यास त्यानें पुण्यास आणिला. तेव्हां बाजिराव नानाशीं आणि दौलतरावाशीं सख्य व्हावें म्हणून यत्न करूं लागला. नाना फडणिसास पुनः दिवाणगिरी सांगावी म्हणून दौलतरावानें आग्रह धरिला. सर्जेराव घाटग्यास त्याचे सारिखाच एक दुसरा दुष्ट सोबती मिळाला.

---

+ करनल पालमर.

त्याचें नाव फकीरजी गाढवा. शिंद्याचे फौजेंतील कांहीं सरदारबायास फि-
तूर झाले आहेत असा आरोप दोघांवर घेऊन दौलतरावाचे परवानगी
शिवाय या दोघांनीं चार सरदारांस ठार मारलें तेव्हां दौलतरावानें आप
ले प्रियकर सासऱ्यास आणि फकीरजीस कैदेंत ठेविलें.

नाना फडणीस कैदेंतून सुटला आणि सर्जेराव कैदेंत पडला. या-
मुळें दौलतराव आणि बाजीराव यांचें वैमनस्य कमी होऊन ते पुनः स्ने
हानें वागूं लागले. नाना फडणीसाचे मनांत पेशव्याचा कारभार पुनः
पतकरण्याचें नवतें, पण दौलतरावाचा आग्रह आणि बाजीरावाचे आ-
र्जवा पुढें त्याचा निरुपाय होऊन त्यास पुनः कारभार पतकरावा ला-
गला. शिंद्याचे छावणींत राहून तो कितीएक दिवस पेशव्याचें काम पा
हात होता, शेवटीं बाजीरावाचे आग्रहास्तव तो शहरांत आपले वाड्यां-
त राहूं लागला. दौलतरावानें दक्षणेतून निघून हिंदुस्थानांत जावें-
असें त्याचे मनांत होतें पण नानाफडणीस खुला होऊन सर्जेरावघाट-
ग्या कैदेंत पडल्या पासून दौलतरावास घालविण्याचा बेत थिजल्या
सारखा जाहला.

कंपनी सरकार टिपूसुलतानाचें राज्य घेण्या करितां हैदरअ-
ल्लीचे कारकीर्दी पासून झटत होते, तीमसलत त्याचे एकट्याचे यत्ना-
नें शेवटास गेली नाहीं. इंग्रज लोकांचें फ्रेंच लोकांशीं हाडवैर असून
निजाम अल्ली, शिंदे यांचे फौजेंत फ्रेंच लोकांचा भरणा फार होता. पेश-
वे, निजाम अल्लि, शिंदे, हे त्रिवर्ग एकत्र होऊन टिपूसुलतानास अनुकू-
ल होतील ही भिती कंपनी सरकारास होती. त्रिवर्गांनीं टिपूसुलताना
स प्रतिकूल होऊन आपल्यास वश व्हावें ह्मणून तीनही दरबारांत
कंपनी सरकारानें तहचीं बोलणी चालविलीं होतीं. निजाम अल्लीनें-
आपले राज्यांतील व फौजेंतील सर्व फराशी लोकांस काढून देण्याचें क
बूल करून टिपूसुलतानाविरुद्ध कुमक करण्याचा तहनामा तारिख १ स-

---

+ तिघांस तोफेचे तोंडीं बांधून उडविलें. चौथा येशवंतराव शिवाजी याचे कानांत तंबु-
ची मेख मोगरीनें ठोकली तणें करून तो मरण पावला.

लला होता, पण तो शेवटास जाईल असा भरवसा कंपनी सरकारास लागेना, तेव्हां ते दौलत रावास हिंदुस्थानांत घालविण्याची मसलत करूं लागले.

अहंमद शाहा आबदल्ली जो पाणिपतचे रणांत मराठे लोकांशीं लढाई करून विजई होऊन स्वदेशास परत गेला, त्याचा नातू जामनशा पुनः हिंदुस्थानांत येणार अशी वदंता त्यावेळेस दाट उठली होती. जामनशाचे भलया पासून तुमचे राज्याचा बचाव व्हावा हें योग्य आहे, याजकरितां तुह्मीं हिंदुस्थानांत जाऊन आपले मुलखाचा सांभाळ करावा, ही भय भदर्शक वार्ता कंपनी सरकारचा वकील दौलत रावास वारंवार सांगूं लागला. दौलतराव हिंदुस्थानांत गेला ह्मणजे बाजीरावाजवळ त्याची स्वतःची फौज नसल्यामुळें तो आपले नादानें वागूं लागेल असा कंपनी सरकारचा मतलब होता. बाजीरावाचा शह सोडून हिंदुस्थानांत जावें असें दौलत रावाचे मनांत नवतें, पण परचक्राचे भयानें तो जाण्याची तयारी करूं लागला. बायांचा दंगा, आणि पैशाची अडचण, या दोन हरकती मुळें त्याचें जाणें होईल न होईल अशी शंका होती. दौलतराव हिंदुस्थानांत गेल्यानें बाजीरावाचा आश्रय कमी होऊन, राज कारभारांत वारंवार त्याजकडून सवती मत्छर उत्पन्न होतो, तो नाहीसा होईल, या आशेनें त्याचें गमन आपल्यास इष्ट कारक होईल असें नाना फडणीसास वाटून, त्याणें आपले खासगी पैकीं आपारखी पंधरा लक्ष रुपये दौलतरावास जाण्याचे तयारीस दिले.

दौलतराव येथून गेला असतां नाना फडणीसास दहशत नाहींशी होऊन, तो आपली काय दशा करील असें भय बाजीरावाचे अंतःकरणांत उत्पन्न जाहलें; आणि तो त्यास राहण्या बद्दल विनवणी करूं लागला. तो त्यास असें सांगूं लागला कीं, नानाचे मनांत कंपनी सरकाराचें भावल्य माझे राज्यांत विशेष वाढवावयाचें आहे, तें तुह्मीं येथून गेल्यावर खचीत वाढेल, याकरतां तुह्मीं येथून तूर्त जाऊंनये असें सांगून त्या-

णें देऊन रावास राहता केला.

आपले नाशाविषयीं बाजीराव शिंद्यांस मिळून कांहीं मसलत करीत आहे, असें नानास वर्तमान समजलें, तेव्हां तो आपला कारभार सोडून स्वस्त बसला. मंतर बाजीराव मध्यरात्रीं नानाकडे गेला आणि शपथे वाहून त्यास सांगितलें कीं, तुह्मास असा संशय कसा उत्पन्न जाहला असेल तो न कळे, माझे स्वप्नांत देखील ही गोष्ट आली नाहीं. प्रियभाषणानें दुसऱ्याचें अंतःकर्णांत द्रव उत्पन्न करण्याचें लाघव, जसें बाजीरावाचे अंगीं होतें तसे लाघवी मनुष्य फार थोडेच आढळतील. ब्राह्मणी राज्याचें संरक्षण आज पर्यंत आपण केलें त. शिंदे, इंग्रज माझे राज्याचे शिकारीस टपले आहेत, अशा समयास आपण ही कारभारांतून आंग काढून घेणार तेव्हां माझी धडगत दिसत नाहीं. असें डोळ्यास अश्रुपात आणून बाजीराव बोलूं लागला. तेव्हां त्याचे मनांत आपले विषयीं कपट नाहीं अशी नानाची खात्री होऊन तो पुनः राजकारभार पाहूं लागला.

हैदराबादेच्या निजामाची कुमक घेऊन कंपनी सरकार टिपू सुलतानाचे राजधानीवर चालून गेलें होतें, ती लढाई सुरु जाहाल्यावर टिपूकडील वकील पुण्यांत बाजीरावाकडे आला होता, तो पेशव्यास, आणि शिंद्यास, असें ह्मणूं लागला कीं, तुह्मीं कंपनी सरकारास मदत देऊं नका. बाजीरावाचे दरबारांत इंग्रजाकडील वकील होता, तो बाजीरावाजवळ कुमक मागत होता. केवळ निजामाचे मदतीनें टिपुसुलतानाचा नाश, कंपनी सरकारचे हातून इतका जलद होईल, असें शिंद्यास आणि पेशव्यास वाटत नवतें त्यांणी टिपूस अथवा कंपनी सरकारास मदत न देतां दोघांशीं स्नेह ठेविला होता. इतक्यांत टिपूसुलतान मारला जाऊन त्याचें राज्य कंपनी सरकारचे हातीं आलें* म्हणून खबर आली. ही खुषखबर ऐकून आह्मास फार आनं

(मार्जिन: इ. सन १७९९ — शके १७२१.)

---

*तारिख ४ माहे मे सन १७९९ इसवी रोजीं टिपूचा मोड होऊन श्रीरंगपट्टणांत कंपनी अमल बसला.

वून श्रीरंगपट्टणास टिपूचे पक्षपाती लोकांस सांगून पाठविलें कीं, टिपू-सुलतान गेला ह्मणून तुह्मीं हवालदील न होतां लढाईचा पिच्छा सोडूं नका.

सर्जेराव घाटग्यानें अमृतरावाचे लष्करावर अकस्मात हल्ला संगमावर केल्यामुळें अमृत रावाचे सैन्याची दुरदशा जाहल्या वर बाया कोल्हापूरचे राज्याकडे निघून गेल्या. नारायणराव बक्षी व दुसरे शेणवी लोक बायांचे पक्षांत येऊन मिळाले आणि त्याणीं कांहीं फौज जमा केली. नंतर त्या बायांचें मोठें बंड जमलें तें कृष्णे पासून गोदावरी नद्यांचे दरम्यान जो दौलत रावाचा मुलूख होता तो लुटूं लागले. दक्षणेंत पेशव्यांची राजसत्ता असतां त्याचे मुलुखांत कांहीं मुलूख शिंद्यां कडे चालत होता. बाया दौलत रावाविरुद्ध बंड करून पेशव्यांच्या राज्यांत धिंगाणा करीत होत्या, त्यांचा उपशम करण्याचा कांहीं एक इलाज बाजीरावानें केला नाहीं; यावरून त्याची फूस बायांस आहे असें लोकांस वाटूं लागलें.

इ. सन १७९९ शके १७२१

लखोबा दादा या नावाचा एक शेणवी ब्राह्मण बाळोबा नात्याचे आश्रयानें, शिंद्याचे दरबारांत मोठे योग्यतेस चढला होता. दौलतराव दक्षणेंत असतां हिंदुस्थानांत जी त्याची फौज होती, तीचा सेनाधिकारी लखोबा दादा होता, तो बाळोबाचे पक्षास अनुकूल आहे, या संशयानें त्याचा अधिकार दौलत रावानें काढून त्यास घरीं बसविला तेव्हां कांही लोक त्यास मिळून तो उज्जनी पासून शिरोंज पर्यंत माळव्यां तील शिंद्याचे मुलखांत दंगा करूं लागला. आग्र्याचा किल्ला लखोबा दादाचे पक्षांतील लोकांचे हातीं होता, तो हस्तगत करण्या करितां अंबाजी इंगळा व मिस्तर पेरान हे दोन सरदार दौलत रावाचे आज्ञे वरून यत्न करीत होते पण फौजेची कुमक नसल्या मुळें किल्ला त्याचे स्वाधीन जाहाला नाहीं. येशवंतराव होळकर पुण्या तून नागपुरास पळून गेल्या वर, तेथें दौलतरावानें त्यास अटकेंत ठेविला हो-

ता तो बंदमुक्त होऊन माळव्यांत दंगा करूं लागला.

दौलत रावाचे विरुद्ध चोहीं कडून बंडाचें काऊर उठल्यावर, तो बायांचें सख्य व्हावें ह्मणून यत्न करूं लागला. बाळोबा तात्यास बंदमुक्त करावा, आणि सर्व राज्याची मालकी आमची आहे, असें समजून राज्य कारभार आमचे विचारें चालावा, असें बाया ह्मणू लागल्या. बाळोबा तात्या कैदेंत पडल्यावर आबा चिटणीस व रायाजी पाटील या उभयतांचे हातीं दौलत रावानें आपला राज कारभार दिला होता. त्या दोन कारभाऱ्यांनीं आपलें स्वहित एकी कडे ठेऊन, आपले धन्याचे हिता करितां बाळोबा तात्यास पुनः दिवाणगिरी द्यावी ह्मणून दौलत रावास सल्ला दिली. बाळोबातात्या बंदांतून सुटून दिवाण गिरीचे कामावर रुजु होतांच, त्यानें लखोबा दादा आणि अंबाजी इंगळ्याचें बंड मोडलें. अकरा लक्षांचा मुलूख बायांचे गुजाऱ्यास द्यावा, आणि त्याणीं बऱ्हाण पुरास राहून असीरगड किल्ला आपले ताब्यांत ठेवावा, असा ठराव बाळोबा तात्यानें त्याशीं करून त्यांचे दागिने व कपडे दौलत रावानें परत दिले. बाया बऱ्हाण पुरास जाण्या करितां पुण्यास जेजोरीचे रस्त्यानें येत असतां, राजवाडीचे रानांत त्यांचे एका चाकरास कोणी ठार मारला, तेव्हां त्या बिचकून पंढरपुरा कडे परत गेल्या.

बाळोबा तात्या कैदेंतून सुटल्यावर नाना फडणीसानें त्याशीं सख्य केलें, नंतर उभयता एकविचारें आप आपला राज कारभार पाहात असतां, कोल्हापुरचे राजानें चतुर्शिंग भोंसल्यास मिळून मोठें बंड केलें. परशराम भाऊ पटवर्धन हे बंड मोडण्या करितां, पेशव्या कडून कांहीं सैन्य घेऊन गेला होता, त्याची पट्टण कुडीचे मुक्कामी कोल्हापूरचे सैन्याशीं लढाई जाहली, त्यांत परशराम भाऊचा पराभव होऊन मरण पावला.

नानाफडणीसाची प्रकृत दिवसें दिवस क्षीण होत होती. तो मार्च महिन्याचे १३ वे तारिखेस† मरण पावला त्या बरोबर पेशव्याचे राज्यांतील शाहाणेपण व मसलत नाहींशी

इ. सन १८०० }
शके १७२२ }

---

† फाल्गुन वद्य ८ शके १७२१.

* नानांचे गुणावगुणांचे वर्णन लिहूं लागलें तर बरेच होईल परंतु या बरवरीन-

न त्याचे पश्चात् त्याचे धनास त्याची बायको मालक होती. बाजी राव आणि दौलतराव त्याचें धन आपल्यास मिळावें, ह्मणून दोघे झटूं लागले. नानाकडे माझे एक कोट रुपये येणें आहेत, अशा निमित्तानें दौलतरावानें त्याची सर्व जाहागीर जप्त करून आपले कबज्यांत घेतली; त्याने बायकोचे मांडीवर दत्तक मुलगा द्यावा असें तो बाजी रावास ह्मणूं लागला, पण त्याणें त्याचें ह्मणणें कबूल केलें नाहीं दौलत रावानें नानाचे बायकोचा पक्ष स्वीकारला, हें पाहून बाजी रावास नुस्तें वाईट वाटून राहिलें नाहीं, पण त्याचे धनामुळें दौलतरावाशीं पुनः त्याचे वैमनस्य उत्पन्न जाहलें.

बाळोबा तात्यानें दौलत रावाकडे स न्त रदबदली करून सर्जेराव घाटग्यास कैदेंतून सोडविला त्यानें पुनः आपल्या जांवयाची मर्जी संपादन करून कृतघ्न होऊन पुनः बाळोबा तात्यास अहंमदनगरचे किल्यांत बंदांत टाकला, आणि धोंडोपंत व नारायणराव बक्षी असे बाळोबा तात्याचे दोघे भावास, तोफेचे तोंडीं बांधून उडविले बाळोबास असें क्रूर शासनानें मारावा असें सर्जेरावाचे मनांत होतें, पण तो कैदेंत आप मौतीनें मरण पावला. बाळोबा तात्या, नाना फडणीस, परशरामभाऊ, हे तीन जुने मुत्सद्दी मरण पावल्यावर दौलतरावास, आणि बाजीरावास, कोणाची दहशत राहिली नाहीं. ते दोघे पाहिजेती मसलत करून सर्जेरावाचे मसलतीनें वागूं लागले. परशराम भाऊचा जाहागीर मुलुख घेण्या विशीं, बाजी रावानें दौलत रावास परवानगी पूर्वीं दिली होती. सर्जे रावानें कोल्हापूरचे राज्यास उत्तेजन देऊन, त्याजकडून परशराम भाऊचा मुलुख लुटून बेचीराख केला. धोंडजी वाघाचें बंड कर्नाटक प्रांतांत उठलें होतें, तें मोडण्या करितां कंपनी सरकारांतून वेलसली सा·

---

त्याचे वर्णनास पुष्कळ जागा सर्व कराची हे शक दिसत नाहीं.

हेब कांहीं सैन्य घेऊन आला होता. त्याचे मदतीस पेशव्याचे पदरचे किती एक सरदार फौज घेऊन गेले होते, त्यांत परशरामभाऊचा मुलगा आपा साहेब होता. कुंदगक मुक्कामीं धोंडजी वाघाशीं कंपनी सरकारची लढाई जाहली, त्यांत धोंडजी पराभव पावून मरण पावला.

कर्नाटकांत जो पेशव्याचा मुलुख होता, त्या लगत कंपनी सरकारचा मुलुख असून, दोन्हीं अमलांत धोंडजी वाघानें उपद्रव केला होता. हें बंड मोडण्यास जेव्हां कंपनी सरकारानें आपलें सैन्य पाठविलें, ते समयीं बाजी रावानें आपले स्वतःचे मुलखांत देखील, त्या प्रसिद्ध बंडखोराचा पाठलाग करण्यास कंपनीचे अंमलदारास परवानगी दिली होती. धोंडजीचे नाशाकरितां कंपनी सरकार प्रवृत्त जाहलें, आणि त्यास यश मिळालें हें दौलत रावास पसंत वाटलें नाहीं. त्यास असें भय उत्पन्न जाहलें कीं, बाजीराव अनायासानें आपले कचाटींत सांपडला आहे, तो सुटून कंपनी सरकारचे हातीं सांपडेल, या समयास बाजीराव पळून जाणार हें वर्तमान मिळालें, तेव्हा त्याचे संरक्षणास दौलतरावानें आपले सैन्याचा वेढा पेशव्याचे वाड्या सभोंवती बसविला होता.

नाना फडणीस मेल्यावर मी स्वतंत्र होईन असें बाजी रावास वाटत होतें, पण तो जिवंत असतां जें त्यास सुख व स्वतंत्रता होती ती त्याचे पश्चात् नाहींशी होऊन, दौलतराव त्यास एखादें राजकीय बंदिवानासारखा वर्तवूं लागला. नाना फडणीसाचे काचास जसा सवाई माधवराव त्रासला होता, तसाच बाजीराव दौलत रावाचे काचास त्रासून, त्यास हिंदुस्थानांत घालविण्याचे विचारांत होता. कंपनी सरकार आपली फौज पेशव्याचे तैनातीस देऊन, तिचे खर्चाबद्दल नक्त पैसा अगर मुलुख लाऊन घेण्यास राजी होतें, पण कंपनी बाहादराचे मदती वांचून मी शिंद्याचे कचाटींतून मोकळा होईन असें बाजीरावाचे मनांत होतें. हिंदुस्थानांत आणि माळव्यांत लखोबा दादानें शिंद्याचे मुलखांत जो दंगा आरंभला होता, तो मोडून स्वस्थता नुकतीच होण्यास आरंभ जाहला होता. इतक्यांत दौलत रावास एक नवीन शत्रु निर्माण जाहला त्याचें-

वारा कडे गेला,तेथें अनंद्राव पवारानें त्यास कांहीं द्रव्य व घोडे दिले. येशवंत रावाची टोळी प्रथम लहान होती,त्यास अमीर खान नावचा एक पठाण आपली टोळी घेऊन सामील जाहला. काशी रावास जरी होळकराचे सरदारीवर दौलत रावानें स्थापन केला होता,तरी येशवंत रावाचे मतें तो सरदारी चालविण्यास अयोग्य होता. मल्हार रावाचा मुलगा. खंडेराव दौलत रावानें आपले ताब्यांत ठेविला होता. काशी राव होळकर दौलत रावाचे ओंजळीनें पाणी पीत होता, या मुळें होळकराचे घराण्यातील खरी सत्ता,व अधिकार,नाहींसा होऊन; होळकरानें घराणें शिंद्याचे अंगभूत जाहलें होतें,तें स्वतंत्र करावें ह्मणून येशवंतराव होळकरांचे मनांत होतें. खंडेराव होळकराचे संस्थानाचा माळक आहे,आणि त्याचे आज्ञे वरून ही मी फौज जमा केली आहे,असा येशवंत रावानें चोहीकडे पुकारा केला;तेव्हां होळकराचे कुळाचा अभिमान बाळगणारे जे लोक होते,ते येशवंतरावाचे सैन्यांत येऊन मिळाले.

असा फौजेचा जमाव जाहाल्यावर, माळवा,आणि नेमाड प्रांतांत, जो शिंद्याचा मुलुख होता तो येशवंतराव लुटूं लागला. होळकराचे मुलखांत खंडे रावाचे नावें तो वसूल घेऊं लागला. येशवंत रावाचें बंड इतकें प्रबल जाहलें असतां, दौलतराव तें मोडण्या विषयीं कांहीं सक्त उपाय न करितां स्वस्थ बसला होता. यांतील कारण असें होतें कीं, काशीराव होळकराचा तुह्मीं पक्ष स्वीकारला आहे तो तुह्मीं सोडाल तर,तुमच्या त्रिवर्ग मातोश्री या बऱ्हाणपुरात राहिल्या आहेत त्यांस,मी कैद करून ठेवितों,असें येशवंतराव दौलतरावास ह्मणत होता,ह्मणून दौलत रावानें सक्त उपाय त्याचे विरुद्ध कांहीं केला नाहीं. येशवंत रावानें बायांस प्रथम कैद करून ठेविल्या,पण त्या कैदेंतून मेवाड प्रांतांत पळून गेल्या. रखोबा दादाचा जगु बापु ह्मणून एक आप्त होता त्याणें बायांस होळकराचे कैदेंतून पळविल्या.

येशवंतराव होळकराचे अनुमता वांचून जरी बाया पळाल्यात

री येशवंत रावानें बायास सोडून दिल्या असें दौलतरावास वाटून, तो उघडपणें त्याचे नाशास प्रवर्त जाहला. येशवंत रावाचे बंडानें दौलतराव आपला शह सोडील असें बाजीरावास वाटून, तो त्याचे बंडाची वृद्धि मना पासून इच्छित होता. माळवे प्रांतांत जो होळकरानें उपद्रव केला आहे त्याचा बंदोबस्त जातीनें झटल्या वांचून होत नाहीं, असें दौलतरावास वाटून त्याणें स्वतः माळव्यांत जाण्याची तयारी केली. त्याचे प्रयाणाचे तयारी करितां बाजीरावानें ४७ लक्षाच्या त्यास हुंड्या दिल्या. बाजीरावाचे रक्षणास सर्जेराव घाटग्याचे ताब्यांत दाहाहजार स्वार व पांच पायदळ पलटणें ठेऊन, बाकी सैन्य घेऊन दौलतराव येशवंत रावाचे पारपत्यास दक्षिणेतून निघाला.

दौलतराव आपल्यावर चालून येत आहे, असें येशवंतरावास वर्तमान समजल्यावर, त्याणें आपलें सर्व सैन्य उज्जनी शहराचे आसमंताद्भागीं जमा केलें होतें; बऱ्हाणपुरास दौलतरावानें आपला मुक्काम केला, आणि तेथून करनल हे सिंग याजबरोबर कांहीं फौज देऊन त्यास उज्जनीस पाठविला तेथें येशवंत रावाची त्याशीं लढाई जाहली, त्यांत करनल हे सिंग पराभव पावला नंतर येशवंतरावानें उज्जनीचे रहिवासी लोकां पासून जबर खंडणी घेऊन, तो शिंद्याचे तोफखान्यास नरमदेचे कांठीं आडवा जाहला, परंतु तोफखान्याचे मुक्कामाची जागा बिकट असल्यामुळें होळकराचा उपाय थकला.

सन १८०१ शके १७२३

शिंदे, होळकर, माळव्यांत आपसांत लढत असतां, बाजीरावानें आपले पदरचे सरदारांत अप्रीति उत्पन्न होण्यासारखें एक कृत्य आरंभलें. पेशव्याचे पदरचे जुने सरदार, मुत्सद्दी, जे त्यांचे बापास व त्यास विरुद्ध होते, त्यांचे सरंजामी इनामी उत्पन्न जप्त करून बहुतेकांस घरीं बसविलें; त्या जुलमी कृत्यानें त्याचे परचे लोक व प्रजा त्याचर नाखुष होऊन, त्यांचे राज्यांत लाहान मोठीं बरींच बंडें उत्पन्न जाहलीं. बाळकृष्ण गंगाधराचें बंड गणपतराव पानशानें मोडलें, त्यांत भिमजी होळ-

...त रावांस धरून कैद केल्यावर,बडोचा अपराधा करितां बाजीरावानें त्यास देहांत शासन देण्याचें ठरविलें.

तारिख १ माहे एप्रील सन १८०१ इसवी रोजीं विठोजी होळकरास पुणें शहरांत हत्तीचे पायांशीं बांधून मारला,तेसमयीं बाजीराव व बाळोजी कुंजीर राजवाड्यांत बसून हा तमाशा पाहात होते. विठोजीस जेव्हां हत्तीचे पायांशीं बाधूं लागले तेव्हां त्याणें मला जिवदान द्यावें ह्मणून बाजीरावाचें फार आर्जव केलें,पण त्या निर्दय पुरुषास त्याची कांहीं दया नयेतां विठोजीचे हाल कसे होतात हे तो स्वस्थ पणें बसून पहात होता. आपले बलाचा आणि ते वेळचे प्रसंगाचा विचार न करितां,बाजी रावानें हें अघोर शासन विठोजीस दिलें ही चूक केली असें आह्मास वाटतें. प्रत्येक मनुष्यास जी स्थिती दुनयेंत प्राप्त होत्ये,त्या स्थितीचे अंगभूत किती एक गूण त्यामनुष्याचे अंगीं असणें अवश्य असतें. निःस्पृहता, निःपक्षपात, गांभिर्य,हे गूण न्यायाधिशाचे अंगीं असणें जसें अवश्य आहे, तसेच क्षमा,धैर्य, शांति, हेगुण राजाचे अंगीं असणें अवश्य आहे. या सर्व गुणाचा बाजीरावाचे अंगीं आभाव असून त्याचे विरूद्ध दुर्गुणानीं तो प्रफुल्लित जाहलेला होता.

दौलतराव, येशवंतराव होळकराचे शहास बऱ्हाणपुरास छावणी करून होता. सर्जेराव घाटगा कांहीं सैन्य घेऊन पुण्यास असतां, तो बाळोजी कुंजिराचे घरीं एक दिवस पैशाकरितां धरणें घेऊन बसला होता, ते समयीं कुंजिराची आणि घाटग्याची भर रस्त्यावर मारामारी होऊन बाळोजी कुंजीर पळाला, तेव्हां पुणें लुटून जाळून टाकतों असें सर्जेराव ह्मणूं लागला त्याची समजूत करण्यास बाजीरावास फार प्रयास पडले. सर्जेराव पुण्यांतून निघून जाईल तर बरें होईल, असें बाजीरावास वाटूं लागलें. दौलत रावाचे फौजेचे एक दोन प्रसंग माळव्यांत एशवंत रावाशीं जाहाले,त्यांत शिंद्याचे फौजेस लागोपाठ अपजय आले, तेव्हां दौलत राव

नें सर्जेरावास सैन्य घेऊन आपले कुमकेस बऱ्हाणपुरास बोलाव-
ल्या वरून तो तिकडे निघून गेला.

शिंद्यांचे राजधानीचें उज्जनी शहर येशवंत रावानें लुटलें
होतें, त्याचें उसनें उगविण्या करितां होळकराचें राजधानीचें इंदूर
शहर सर्जेरावानें जाऊन लुटलें. त्याच्या बचावा करितां येशवंत
राव आपली फौज घेऊन आला होता, पण तो पराभव पावला.
नंतर इंदुरांत आपलें स्मरण राहील असा घाटग्यानें लोकांवर जु
लूम केला. दौलत रावाचे हिमायतीनें काशीराव, होळकराचे सर
दारीवर स्थापन जाहला असून, तो दौलत रावाचें छावणींत रा
हात होता. त्यास त्याणें आपले छावणीतून काढून येशवंत रावा
कडे पाठविला. आणि त्यास असें लिहून पाठविलें कीं, काशीरा
व्यास सरदारी वरून दूर करून तुह्माकडे त्याचा अधिकार दिला
आहे. असे येशवंतराव होळकराशीं सख्य होण्याचे उपाय दौलत
रावानें योजले असतां, तो त्याचा अनादर करून बंडास प्रवर्त झा-
ला. इंदुरास येशवंत रावाचा मोड जाहाल्यावर दौलत रावास अ-
सें वाटलें कीं, आतां येशवंतराव बंडाचा छंद सोडून स्वस्त बसे
ल, पण तसें न होतां त्यास उलटा दुप्पट जोर आला.

खानदेशांत जो होळकराचा मुलूख होता, तो शिंद्यां कडील
(इ॰ सन १८०२ / शके १७२५) अमलदार लुटीत असतां, बाजी रावाचे अमलदा-
र होळकराचा मुलूख पृथक् पणी लुटूं लागले.
शिंदे आणि होळकराचा धनी बाजीराव असून, तो उभयतांचा कलह मोड
ण्याचा यत्न न करतां उलटा होळकराशीं विरोधानें वागूं लागला. यामुळें ये
शवंतरावास विशेष क्रोधास चढण्यास कारण होऊन, तो पुण्यावर स्वारी
करावयाचा बेत करूं लागला. फत्तेसिंगमानें आणि शाह अहंमदखा
न, हे दोन होळकराचे सरदार पेशव्याचा मुलुख लुटीत खानदेशांतून पु
ण्या कडे निघाले. शाहा अहंमदखान पुण्या नजीक आल्यावर, त्यास
नरसिंह खंडेराव विंचूरकर पंधराशें स्वार घेऊन आडवा जाहाला. त्यां
त विंचूरकर पराभव पावला.

मागुं लागला, तेव्हां इंग्रजा कडील वकीलानें एक तहनाम्याचा मसुदा दिला, तो त्यास मंजूर जाहला नाहीं. दौलतराव, आणि रघोजी भोंसले, या उभयतांचे मनातून इंग्रज सरकाराशीं बाजीरावाचा तह होऊन सख्य व्हावें असें नवतें, ह्मणून ते या तहनाम्याचे कामांत वारंवार बाजीरावास हरकती दाखवूं लागले.

महादजीने स्त्रियांचा बंदोबस्त अंबाजी इंगळे यानें करून दिल्यावर, लखोबा दादा मरण पावला. नंतर शिंद्याचे हिंदुस्थानांतील मुलखांत कांहीं बखेडा राहिला नाहीं, असें असतां दौलतरावाचे हातून, येशवंत रावाचा पाठलाग जसा सक्तीनें व्हावा, तसा त्यानें केला नाहीं यांतील कारण काय असेल तें समजत नाहीं. सदाशीव भाऊ भास्कर याजबरोबर कांहीं फौज देऊन, त्यास येशवंत रावाचे पाठलागास त्याणें पाठविला होता, तो नरमदा उतरून बऱ्हाणपुरास आल्यावर, पगाराचे तलफे करितां त्याचे हातारवालचें सर्व सैन्य अडून बसलें. त्याची समजूत होईं पर्यंत तापी नदीस पूर येऊन उतार नाहींसा जाहला. मराठी राज्यांत फौजेचा व इतर नौकर लोकांचा पगार महिन्याचे महिन्यास देत नवते, साहामाही किंवा तिमाही पगार वांटीत होते असाकीं, तीन महिने चढले ह्मणजे एक महिन्याचा पगार देऊन, दोन महिने शिल्लकेस ठेवावे. साहामहिन्यांचा पगार चढला ह्मणजे, दोन महिन्याचा देऊन चार महिने शिल्लकेस ठेवावे. या वाईट चालीचा परिणाम काय होत होता, तो मराठी राज्यांतील सर्व सैन्याधिकाऱ्याचे वारंवार अनुभवास येत असून, ही चाल बंद करण्याचा कोणी उपाय योजला नाहीं हें आश्चर्य आहे. जर धनी पगारा करितां आपलेचाकराचा मिंधा असेल तर, त्या धन्यास तेजनाहींसें होऊन चाकर लोक उद्दाम होतात, ही गोष्ट बहुतेकाचे अनुभवास दररोज येत असेल. फौजेंतील शिपाई जिवावर उदार करून सेनाधिकाऱ्यास स्वारीवर न्यावें लागतात. त्यांचा जर सेनाधिकारी पगारा करितां मिंधा असला ह्मणजे, त

हालास उपमा देववत नाहीं. स्वांरीचे अवसानास फौज अडून बसते हें एक,व कधीं कधीं शत्रूकडे चांदरातीस पगार मिळतो,अशी खात्री जाहाली ह्मणजे आपल्या धन्यास सोडून,शत्रूकडे निःशंकपणें शिपाई जाऊन मिळतात. हे प्रसंग मराठे सरदारांस वारंवारस्येत होते. मराठे लोकांची राजसत्ता लयास जाण्यास अनेक कारणाचा समूह जाहला,त्यांत फौजेची पगाराची तलफ नेहमीच दलेली राहात असे,हें एक कारण होय

येशवंत होळकर खानदेश आणि गंगथडी यांत लुटीत पुण्याकडे निघाला,तेव्हां बाजीरावानें त्यास सांगून पाठविलें कीं, तुमचें दौलतरावाशीं वांकडें आहे,त्या वांकुडपणाचा मी मध्यस्त होऊन निकाल लाविनों,पण हा निकाल लागे पर्यंत,तुह्मीं गोदावरीचे आलीकडे येऊन ये. त्यावर येशवंत रावानें उत्तर पाठविलें कीं, माझा भाऊ विठोजी होळकर जो तुह्मीं मारला तो आतां मागे येतो असें नाहीं. माझा पुतण्या खंडेराव जो तुह्मीं आपले अटकेंत ठेविला आहे त्यास सोडून देऊन,होळकराचे मुलखा पैकीं जो तुह्मीं व शिंद्यानीं मुलूख घेतला असेल तो परत द्यावा,येवढें माझें मागणें आहे. हें येशवंत रावानें ह्मणणें कबूल करण्याचा घाट बाजी रावानें बाल्यात कारी घालून,खंडेरावाच्या कैदेचा बंदोबस्त अशरगडचे किल्यांत त्याणें विशेष करविला. आणि सदाशीव भाऊ भास्करास आपल्या फौजेची तुकडी घेऊन पुण्याकडे तावडतोब बलाविला.

फतेसींग माने येशवंतराव होळकराचे पदरचा सरदार कांहीं सैन्य घेऊन गारदंडाकडे मुलुख लुटीत असतां,त्याचा मोड करण्याकरितां,पांडोजी कुंजीर बाजीरावा कडून गेला होता,त्याचा पराभव गारदंडास फतेशिंगानें केला. नाना पुरंदरे,आणि गणपतराव पानसे, हे दोन पेशव्याकडील सरदार पांडोजीचे कुमकेस बारामतीस कांहीं सैन्य घेऊन राहिले होते,त्या दोघांचाही पराभव फतेशिंगानें करून, तो पुण्याकडे येऊं लागला. कर्नाटक मांतांत जे पेशव्याचे सरदार होते त्यांत पटवर्धन मंडळी प्रमुख होती. बाजीरावानें पटवर्धनाचे-

मर्जी विरुद्ध माधवराव रास्त्यास कैद केला, ह्मणून बहुतेक पटवर्धन सरदार बाजी रावावर नाखुष जाहाले होते. तथापि चिंतामणराव आपा पटवर्धन आपले फौजेचें पथक घेऊन पेशव्याचे कुमके करितां आला आणि कांहीं दिवस राहून लागलाच परत निघून गेला.

सदाशीव भाऊ भास्कर शिंद्याचे सैन्य घेऊन जालना आणि बिडा कडून येऊन बाजीरावाचे फौजेंत मिळाला. शिंदे आणि पेशवे-ह्यांचें एकत्र सैन्य होऊन आलेबेलह्याचे रस्त्यावर येशवंत राव-होळकरास अडवावा ह्मणून जाऊन बसले. येसवंतराव आलेबेलह्या चा रस्ता सोडून अहमद नगराकडून जेजोरीचे रस्त्यानें राजवाडीचे मुक्कामीं फतेशिंग मान्याचे फौजेत तो येऊन मिळाला. नंतर-तारिख २३ अक्टोबर रोजीं येशवंत रावानें आपले फौजेचे डेरे लोणी आणि हडपसर गांवचे मध्यभागीं लाविले. पेशव्याचें सैन्य आलेबेलह्याचे रस्त्यावर जाऊन बसले होते, ते परत पुण्यास आल्यावर बाजी रावानें येशवंत रावास सांगून पाठविलें कीं, तुह्मीं-आमचे पदरचे सरदार असतां, आमचे संमती वांचून तुह्मीं आपलें सैन्य इतकें कशा करितां जमा केलें हें समजत नाहीं, याकरितां आपले सैन्याचा जमाव मोडून तुह्मीं परत निघून जावें. येशवंत रावानें उलट जबाब असा पाठविला कीं, तुमचे दरबारांत दौलतराव शिंद्याचें माहात्म वाढून तुमचा धनीपणा कायम राहिला नाहीं, यास्तव तुमची आज्ञा मानावी किंवा नाहीं, ही शंका मला उत्पन्न जाहली आहे. खंडेराव होळकरास कैदेंतून सोडावा ह्मणून आपली आज्ञा असतां, त्याची मुक्तता होणें ती एकीकडे राहून उलट त्याची कैद शिंद्यानें विशेष सक्त केली इतकेंच नाहीं, पण आपण माझे माहाल वगैरे परत देतों, ह्मणून जी कबुलायत केली होती, ती अमलांत येऊं नये ह्मणून दौलतरावानें आपले सरदारास तुह्माकडे पाठविला आहे. आपण आपला धनीपणा टाकून दौलत रावाचे आधीन जाहलां आहां, आणि होळकराचे घराण्याची इतकी दुरदशा होण्यास दौलतराव मू

क कारण आहे, त्याचे शहरांतून आपल्यास काढून स्वतंत्र करावें ह्मणून मी आलों आहें; या शिवाय माझे येण्यांत दुसरा कांहीं एक हेतु नाहीं.

येशवंत रावाची समजूत बाजीरावाचे हातून होईना, शेवटीं तारिख २५ अकटंबर रोजीं उभयतांचीं लढाई होऊन बाजीरावाचा मोडजाहला. बाजी रावाचे आणि शिंद्याचें सैन्य एकत्र होऊन पुण्यास होळकराबरोबर लढत असतां, त्याचे बरोबर उभयतांचे फौजेचा टिकाव लागला नाहीं. लढाईस आरंभ होण्या पूर्वी बाजीराव पुण्यांतून सिंहगडास गेला होता, तेथें आपले अपजयाचें वर्तमान त्यास कळतांच, तो रायगडा करून वसईकडे पळून गेला. बाजीराव एकाएकीं इंग्रज लोकांकडे नजातां, परत पुण्यास येऊन आपले स्वतःचे राज्याचा बंदोबस्त करील, असें येशवंतरावास वाटत होतें, पण तसें घडून आलें नाहीं. बाजीरावा विषयीं येशवंतरावाची निराशा जाहल्यावर, अमृतरावास त्याणें जुनराहून कैदेंतून सोडून आणून त्यास बाजीरावाचे जागीं पेशवा करावा असें मनांत आणिलें. अमृतराव पेशवाईचा अधिकार कांहीं दिवस पतकरीत नवता, पण बाजीराव परत येत नाहीं अशी खात्री जाहाल्यावर, तारिख १२ नवंबर रोजीं तो येशवंत रावाचे आग्रहास्तव पेशवाईचा अधिकार चालवूं लागला. दौलतरावानें बाजीरावास राज्यावर स्थापन करून, सर्जेरावाचे हातून जसें शहर लुटविलें, तसा नमुना अमृत रावास पेशवा करून येशवंतरावानें पुण्यास आरंभला. फौजेचे खर्चा करितां त्यानें हरनाथ आणि हरीपंत भावे या दोघांस पुणें शहर लुटण्यास परवानगी दिली. या दोघांनीं श्रीमान लोकांस माराहाण करून बरेंच द्रव्य जमा केलें.

सातारचे राज्यास पेशव्यानीं बुदबळांतील जसे राजे करून ठेविले होते, तसेच शिंदे होळकरानीं पेशव्यांस बुदबळांतील पेशवे करून, मराठी राज्याचा खेळ मांडला होता; त्या खेळांत इंग्रज लोक सामील होऊन त्यानीं सर्व मराठी सरदारावर त्यांचे मात केली. बाजीरावास पेशवाईचा अधिकार प्राप्त झाला, तेव्हां पासून आमची फौज तुह्मीं आपले राज्याचे रक्षणास ठेवा आणि

इ॰ सन १८०२ शके १७२५

इ॰ सन १८०२ शके १७२५

त्याचे खर्चाबद्दल आह्मास कांहीं मुलूख नेमून द्या, ह्मणून कंपनी सरकार त्यास विनवीत असतां, त्यानें त्याचें ह्मणणें कबूल केलें नाहीं. शेवटीं कंपनी सरकारचे आश्रया खेरीज आपला तरुणोपाय होत नाहीं, असें त्यास वाटून, ते ह्मणतील तसा तह करून देण्यास तो वसई मुक्कामीं राजी जाहला. आपलें राज्य रक्षणाकरितां साहा हजार पायदळ, व कांहीं तोफा कंपनी सरकारानें माझे राज्यांत नेहमी ठेवाव्या, त्याचे खर्चास २६ लक्षांचा मुलूख मी कंपनी सरकारास नेमून देईन. त्या फौजे करितां जें सामान कंपनी सरकारांतून माझे मुलखांत येईल, त्यावर जकात घेण्यांत येणार नाहीं. कंपनी सरकारा विरूद्ध जे युरोपियन लोक असतील, त्यांस मी आपले राज्यांत आश्रय देणार नाहीं. गायकवाड, आणि निजाम, यांजकडे गुजराथेचे वसूला बाबत, आणि चौथाई खंडणी बद्दल, माझे दावे आहेत त्याचा निकाल कंपनी सरकार मध्यस्त होऊन करितील, तो मला मान्य होईल, कोणतेही पर दरबाराशीं, किंवा संस्थानाशीं, तह अथवा लढाई कंपनी सरकारचे इतल्याखेरीज, मी करणार नाहीं, अशा मतलबाचा तह तारिख ३१ दिजंबर सन १८०२ इसवी रोजीं, बाजी रावानें कंपनी सरकारास करून देऊन, आपले स्वातंत्र्याचे बद्दल त्याणें आपले राज्याचें संरक्षण केलें.

बाजी रावाचे बुद्धीस स्थीरता मुळींच नवती, हरयेक कामांत त्याचे मनाची द्विधावस्था होत असे, येणें करून त्याची कोणतीही मसलत अवल पासून अखेर परयंत तडीस गेली नाहीं. कंपनी सरकारचे हातीं तहनामा सही करून दिल्यावर, त्यास असें वाटलें कीं, त्या तह नाम्यानें आपण आपलें सर्वस्वी नुकसान करून घेतलें, हें चांगलें जाहलें नाहीं. बाळोजी कुंजीरास दौलत रावाकडे, आणि नारायणराव वैद्यास रघुजी भोंसल्याकडे, पाठऊन उभयतांस त्यानें लिहून पाठविलें कीं, तुह्मीं उभयतां होळकराचे प्रसंगास पुण्यास नसल्या मुळें, मला वसईस जाणें प्राप्त जाहलें. तेथें कंपनी सरकारचे शह्यास सांपडून, त्याणी ह्मटला तसा तहनामा मी त्यांस करून दिला आहे. हा तहनामा कायम राहीलतर आपले सर्वांचे ना-

शास कारण होईल, याजकरितां तुह्मीं एकत्र होऊन इंग्रज लोकांस दक्षणेंतून काढण्याचा इलाज करावा. बाजीरावाशीं कंपनी सरकारचा तहनामा जाहाला हें रघोजी भोंसल्यास आणि दौलतराव शिंद्यास चांगलें वाटलें नाहीं. फौजेचे कमताईमुळें बाजीराव निरंतर आपल्यास अवलंबून राहील, असा दौलतरावास भरवसा होता तो वसईच्या तहापासून नाहींसा जाहाला.

कंपनी सरकारानें आपली फौज देऊन बाजीरावास पुनःपुनः (स.१८०२) त्याचे गादीवर तारिख २३ मे रोजीं स्थापन केला. वसईच्या तहनाम्यास अनुसरून दौलतरावाशीं एक नवीन तह करावा, ह्मणून कंपनी सरकार यत्न करीत होतें, पण तें दौलतरावानें कबूल केलें नाहीं. कंपनी सरकारा विरुद्ध लढाई करावयाची या रूत्यास येशवंतराव होळकर अनुकूल जाहल्यास बरें होईल, असें दौलतरावास आणि रघूजीस वाटत होतें. दौलतराव आणि येशवंतराव या उभयतांत जें वैमनस्य वाढलें होतें, तें मोडावें ह्मणून रघोजी मध्यस्ती करीत होता. खंडेराव होळकर दौलतरावाचे केदेंत होता त्यास दौलतरावानें सोडून दिल्हा. माळव्यांतील होळकराचा मुलूख शिंद्याचे ताब्यांत होता, तो येशवंतरावास परत दिला. मी तुह्मास अनुकूल होतों किंवा नाहीं असा एक जबाब येशवंतरावानें बरेच दिवस उभयतांस सांगितला नाहीं; तेणेंकरून उभयतांस येशवंतरावाचे मदतीची आशा होती, ती येशवंतरावानें नाहीं ह्मणून सांगितल्यावर नाहीशी जाहली.

रघोजी भोंसले, दौलतराव शिंदे, आणि बाजीराव, हे त्रिवर्ग कंपनी सरकाराशीं लढाईच्या गुप्त मसलती करीत असतां, लोकांत लढाई सुरू होण्याच्या खबरी लोक उघडपणी बोलत होते. भोसले आणि शिंदे या दोन्हीं दबारांतील कंपनी सरकारचे रसिडेंटास असें वाटूं लागलें कीं, त्या दोन सरदारांचे मनांत कंपनी सरकारा विरुद्ध लढाई चालविण्याचा इरादा आहे, तेव्हां दौलतरावास गवरनर जनरल यापीं स्पष्ट जबाब विचारला कीं, तुमचे मनांत लढाई कराव-

याची आहे किंवा सख्य राखावयाचें आहे तें सांगा. दौलतरावा स येशवंतराव होळकराकडील मदतीचा नाद होता, ह्मणून त्याणें रसिदे दास कांही एक जबाब बरेच दिवस दिला नाहीं. दौलतराव बऱ्हाणपुरा स आपलें सैन्य घेऊन होळकराचे शहावर बसला होता,तो निजामा चे सरहद्दीवर जाऊन बसला. त्यास रघोजी भोंसला आपली फौज घे ऊन मिळाला कंपनी सरकारा कडील जनरल वेलसली साहेब कांहीं फौ ज जमा करून अहंमद नगराजवळ राहिला होता, त्यास या दोन सरदा रांचे तोंडावर राहावें, अथवा प्रसंग आल्यास लढाई करावी, ह्मणून गव रनर जनरल यांणीं अधिकार दिला होता.

वसई मुक्कामी जो बाजीरावानें कंपनी सरकाराशीं तहनामा के ला आहे, त्यास बाध आणावा, कंपनी सरकाराशीं वैमनस्य वाढवावें, अ सें आमचे मनांत नाहीं असें दौलतराव आणि रघोजी वरकरणी वेलस ली साहेबास सांगत होते. तेव्हां त्याणें असें सांगून पाठविलें कीं, जर हें तु मचें ह्मणणें खरें असेल तर, तुह्मीं उभयतांनीं आप आपले मुलखांत जा वें व मीहि आपलें सर्व सैन्य घेऊन कंपनी सरकारचे मुलखांत जातों, अ सें तुह्मा कडून न घडेल तर, तुमचे मनांत लढाई करावयाची आहे असें उघडपणें सिद्ध होईल. रघोजी, आणि दौलतराव, या दोघांस वेलसली साहेबाचें ह्मणणें पसंत वाटलें नाहीं, तेव्हां दोहीं दरबारांतील रसिदेंट तारिख ३ अगष्ट रोजीं निघून कंपनी सरकारचे इलाख्यांत गेले, तेव्हां या दोघांचे मनांत कंपनी सरकारा विरुद्ध लढाई करावयाची आहे असें उघडपणें प्रसिद्ध जाहलें. दोघांचें सैन्य सुमारें एक लक्ष होतें. हिंदुस्थान गुजराथ, आणि दक्षण, या तीन प्रांतांत कंपनी सरकारानें तीन फौजेच्या टोळ्या निर निराळे अधिकाऱ्यांचे हाताखालीं नेमून दिल्या, त्या सर्व सै न्याचा अजमास एकंदर पन्नास हजार होता.

दक्षणेतील तुकडीचा अधिकार जनरल वेलसली साहेबा कडे अ सून, त्यास दोनी दरबारांतील वकीलानीं सख्य होण्याची आशा नाहीं ह्म णून लिहून पाठविलें, ते वेळेस त्याचा मुक्काम वाळकी गांवीं होता, हा गांव अहंमदनगरा पासून चार कोश लांब आहे. वेलसली साहेबाचे हाता

ली सुमारें ६००० फौज होती तो लागलाच अहंमदनगरचे किल्यावर-हल्ला करणार होता,पण पावसामुळें त्यास कांहीं दिवस विलंब करावा लागला. तारिख ८ अगष्टरोजीं किल्यास वेढा बसवून घेण्यास आरंभ केला. तो किल्यांतील स्वार शिवबंदीनें किल्याचें रक्षण कांहीं दिवस केलें,परंतु हल्ला करणारा पुढें आपला टिकाव लागणार नाहीं,असें वाटून किल्लेदारानें तारिख १२ अगष्ट रोजीं किल्ला वेलसली साहेबास दिला,आणि तो-आपली खासगी मालमत्ता १५ शें शिव बंदी घेऊन किल्या बाहेर निघाला. या कृत्याबद्दल दौलतरावाची किल्ले दारावर गैरमर्जी जाहली होती. अहंमद नगरचा किल्ला हस्तगत जाहाल्यावर,वेलसली साहेब आपली फौज घेऊन औरंगाबादेकडे गेला तेसमयीं दौलतराव व रघोजी आपले सैन्यासह अजंठ्याचे घाटांत होते.

रघोजी व दौलतराव हे उभयतां तरुण असून,त्यांस युद्ध संग्रामाची माहिती नवती. शिंद्याचे फौजेंत तोफखान्यावर आणि पायदळांत फराशी सरदार फार होते,त्यांचे भरवशावर या लढाईचा परिणाम अपल्यास जय प्राप्त जाहल्या वांचून दुसरा होणार नाहीं,अशी दौलत रावास खात्री होती,व मुलखांत लुटालूट आणि धांवपळ करून पूर्वीं मराठे सरदारांनीं जसें मुसलमानास कायल केलें होतें,तसा-प्रकार आतां करून कंपनी सरकारचे सैन्यास कायल करावें,असा रघोजी भोंसल्याचा विचार होता,पण त्याचे हातून तो अमलांत आला नाहीं. मुसलमान लोकांचें हिंदुस्थानात राज्य कायम असतां,आपले पूर्वजानीं जे उपाय व युक्ती करून राज्यसंपादन केलें,त्याच उपायानीं आह्मीं ही इंग्रज सरकारा पासून राज्य हिराऊन घेऊं,असे समजूतीनें आमचे लोकांनीं आज पर्यंत जितके यत्न केले ते सर्व फसले गेले. या भ्रामक समजुतीनें जरी कोणी अद्याप असा अप्रयोजक यत्न करावयाचा मनांत आणिलें,तरीं तो निःसंशय फसला जाईल. आमचे लोकांचें युद्धतारकीक,शौर्य,आणि लुटारूपणा,हे गुण जसे मुसलमानी राज्याचे वृद्धावस्थेंत गुणाकारी जाहले,तसे ते गुण आमचे इंग्रज सरकारचे तारुण्य दशेंत गुणाकारी होणार नाहींत. मराठे लोकांचा ज्याकाळीं

उदय जाहाला, ते वेळचे मुसलमान लोकांशीं त्याची तुलना केली अ-सतां, मराठे लोकांत पराक्रम ज्यास्त होता असें दिसून येईल. परंतु आपले लोकांची इंग्रज लोकांशीं कोणतेही गोष्टींत साम्यता प्रस्तुत करूं म्हटलें तर, शेळीनें वाघापुढें जर आपले मिशावर ताव दिला तर, जितकी तिची लोकांत थट्टा होईल, त्याप्रमाणें आमचे लोकांनीं इंग्रज सरकाराशीं अगर लोकांशीं, बरोबरी अगर वरचस्व करूं म्हटल्यास त्यांचीही कमी थट्टा होईल असें वाटत नाहीं.

जनरल वेलसली साहेब शत्रूचा शोध लावीत औरंगाबादेहून पुढें गेला तों जुवा आणि केळना नद्यांचे मध्यभागीं असाई गांवानजीक शत्रूचे सैन्याचा तळ त्यानें पाहिला. शत्रूचे सैन्याचा अजमास पन्नास हजारांवर असून, वेलसली साहेबाचे तुकडींत बाजीराव आणि हैसूर राजाची फौज मदतीस होती, त्या सुद्धां पांच हजार लोक होते. मराठी फौजेच्या दमाचा आणि शौर्याचा वेलसली साहेबास चांगला अजमास होता, म्हणून त्याणे आपले व शत्रूचे सैन्याचा जमीन असमानाइतका फरक असतां, एकाएकीं हल्ला करण्याची मसलत योजली. तारिख २३ सेप्टंबर रोजीं लढाईस आरंभ जाहाला, तेसमयीं पेशवे व हैसूरचे राजाचे स्वार लढाईचे तोंडावर नपालतां, फक्त कंपनीचें लष्कर अघाडीस त्यानें घातले होते. लढाईस-आरंभ होतांच रघोजी भोंसला पळाला, व दौलतराव कांहीं वेळ उभा होता. इंग्रजी तोफांचा भडिमार आणि पायदळाची बंदुक सुरू जाहाल्यावर, शत्रू कडील सैन्यांत अव्यवस्था होऊन, चौंही दिशेस ते अवजड सैन्य फांकूं लागले तेव्हां त्यास मागें रेटीत इंग्रजी सैन्य जात असतां, मार्गांत शत्रुकडील पुष्कळ शिपाई मेल्या सारखे घायाळ होऊन पडलेले आढळले. आपली फौज मागे हटत चालली हें पाहून दौलतरावही युद्ध प्रसंग टाकून निघून गेला. इंग्रजा कडील सैन्य आपले आंगावरून पुढें गेल्यावर, मेल्या सारखे जे शत्रूचे शिपाई रणांत जागोजाग पडले होते, ते त्या सैन्यावर मागून हल्ला करीत होते, असे भयंकर प्रसंगांत वेलसली साहेबाचे फौ-

जेचें फारनुकसान होऊन शेवटीं त्यास जय मिळाला.

मराठे फौजेंत बाराशें मनुष्यें ठार पडून घायाळ झालेले लोक रणभूमी वर जागो जागीं किती पडले होते, त्याचा अजमास लागला नाहीं. शिंद्याचे पदरीं यादवराव भास्कर दिवाण होता तो या लढाईंत पडला. शिंद्याचे तोफखान्यावरील फराशी लोकांनीं आपल्या तोफा अखेर पर्यंत सोडल्या नाहींत. इंग्रज, फ्रेंच व इतर युरोपियन लोक जे मराठी फौजेंत नोंकर असतील, ते मराठी सैन्य सोडून आमचे लष्करांत येऊन मिळतील तर, त्यांचा बंदोबस्त आह्मीं चांगले रीतीनें करूं, असा जाहीरनामा कंपनीचे तर्फे वेलसली साहेबानें लढाईस आरंभ होण्या पूर्वी लाविला होता. त्यामुळें पुष्कळ युरोपियन मराठी सैन्यांतून त्याकडे येऊन मिळाले. युरोपियन लोक ऐन अवसान समयास एका एकीं फिरून कंपनीचे फौजेंत जाऊन मिळाले, येणें करून मराठी फौजेचा मोड लौकर होण्यास, कंपनीचे सेनाधिकाऱ्यास साधन जाहालें. कंपनीचे फौजेंत नेटीव लोक पुष्कळ चाकर होते, त्यांस आश्रय देण्याचा इलाज करून त्याणीं कंपनीचा बाव्हटा सोडून, आह्मा कडे येऊन मिळावें, असा यत्न कोणते ही मराठे सरदारानें केल्याचें एकही उदाहरण आज पर्यंत आढळलें नाहीं हें मोठें आश्चर्य आहे.

दौलतरावाशीं जेव्हां कंपनी सरकारचा बिघाड जाहाला, तेव्हां गुजराथ, हिंदुस्थान, आणि दक्षण, प्रांतांत जो त्याचा मुलूख होता त्यावर एकदम तिहीं कडून हल्ला करण्याची तजवीज कंपनी सरकारानीं आरंभली. वेलसली साहेबानें अहंमद नगरचा सुभा घेऊन आसईच्या लढाईंत दौलतरावास जिंकिलें. आणि असीरगडचा किल्ला आणि बऱ्हाण पूरचें ठाणें त्यानें हस्तगत केलें. गुजराथ प्रांतीं भडोच चांपानीयर आणि पवनगड हे तीन शिंद्याचे माहाल होते, ते कंपनी सरकारचे हातीं लागले. उत्तर हिंदुस्थानांत शिंद्याचा मुलुख फार असून, त्याचे रक्षणास पेरान नावाचा एक फराशी सरदार होता. हा मुलुख घेण्या करितां कं-

पनी सरकारचे मुख्य सेनाधिकारी जनरल लेक यांणीं कानपुरास फौ
ज जमा केली. तारिख २९ अगष्ट रोजीं पेरान आणि जनरल लेक
यांची प्रथम कोलचे ठाण्यावर गांठ पडली. पेरानजवळ पंधराह
जार फौज होती, तथापि कोलचें ठाणें लेक साहेबानें घेतल्यावर,
तो अलीगडचा किल्ला घेण्या करीतां यत्न करूं लागला. हा किल्ला
क्षयकोट असून त्याचे सभोंवतीं मोठा खंदक होता. किल्ल्यांत सा
मग्री फार होती ह्मणून हा किल्ला घेण्यास कंपनी सरकारास फार
आयास पडले, शेवटीं मोठमोठ्या तोफा लावून किल्याचे तटास
भोंकें पाडून कंपनीचें सैन्य किल्यांत शिरलें तेव्हां फराशी पेरा
न नावाचा किल्लेदार त्याचे हातीं बंदिवान सांपडला, आणि त्या
चे हाताखालचे दोन हजार शिपाई मरण पावले.

शिकोबाद येथें कंपनीची छावणी होती, तो शिंद्यांकडील ए
का टोळीनें जाऊन घेतली. छावणींतील शिपाई यानीं आह्मीं
शिंद्याचे विरुद्ध कधींही पुनः लढणार नाहीं अशी भाक दिली,
तेव्हां शिंद्याचे अधिकाऱ्यानें सर्व शिपायांस हत्यारें घेऊन सोडू
न दिले. फौजेचे खर्चा करितां फराशी सरदाराकडे अंतरवेदीं
त माहादजी बावानें नेमून दिला होता, तो मांत आपल्यास मि
ळावा ह्मणून अंबाजी इंगळा फ्रेंच सरदारांशीं स्पर्धा करूं लागला.
हिंदुस्थानातील राज्याचे रक्षणाची जबाबदारी पेरान नावाचे फराशी स
रदाराकडे असतां, अलिगडचा किल्ला कंपनीसरकारानें घेतला, ह्मणून
लत रावाची त्यावर गैरमर्जी जाहाली. यजमानाची अवकृपा आणि इं
ग्रजांची हेवा पाहून पेरान आपलें कुटुंब घेऊन स्वदेशास गेला.

अलिगड घेतल्यावर जनरल लेक साहेब दिल्ली घेण्या करितां
ला, तेथें लुईस बर्क्वीन शिंद्या कडील फराशी सरदार लेकसाहेबां
बर लढूं लागला. त्याचा मोड होऊन दिल्लि शहर कंपनीचे हातीं लाग
त्या प्रसंगीं शिंद्याचे फौजेंतील तीन हजार मनुष्य रणांत पडलें. दि
ल्लींत शाह अलम बादशाहा शिंद्याचे ताब्यांत राहात होता, तो कंपनी
रकारचे हातीं सांपडला. आग्र्याचा किल्ला शिंद्याचे ताब्यांत असून

त्यांत दारुगोळा, तोफा आणि द्रव्याचा खजिना ठेविला होता. हा कि-
ल्ला इंग्रजी अमलदाराचे ताब्यांत दौलतरावानें ठेविला होता. कंपनीस
रकाराशीं जेव्हां लढाई चालू जाहाली, तेव्हां इंग्रज किल्लेदारास त्याचे-
हाता खालचे शिवबंदीनें कैद केलें होतें. त्या किल्यास लेक साहेबानें-
वेढा बसविल्या वर, किल्यांतील शिवबंदी पैकीं अडीच हजार शिपा
ई लेक साहेबाचे सैन्यांत जाऊन मिळाले, त्यानें त्यांस आपले फौजें
त चाकरीस ठेविलें; बाकी किल्ल्यांत राहिलेले लोकांनीं तारिख १८ अ
क्टंबर रोजीं किल्ला खजिना, व इतर सामाना सहित लेक साहेबाचे-
हातीं दिला.

हिंदुस्थानांतील फौजेचे कुमकेस दौलतरावानें दक्षिणेंतून कां
हीं सैन्य रवाना केलें होतें. त्या सैन्याचे अधिकाऱ्याचे मनांत दिल्ली,
आग्रा, अलिगड, हीं ठिकाणें पुनः हस्तगत करावयाचे होतें. या टोळीचे
शोधास लेक साहेब हिंडत असतां, लासवाडी व मोहलपुराचे मैदानां
त त्या टोळीची आणि त्याची गांठ पडली. लढाई सुरू जाहाल्यावर शिं
द्याचे शिकलेले फौजेनें इतकी सुरेख लढाई चालविली होती कीं, लेक
साहेब शत्रूचे सर्व सैन्याचा पराक्रम पाहून वारंवार चकित होऊं लाग-
ला. शेवटीं त्याचे फौजेतील एक हजार मनुष्यें बळी गेल्यावर लासवा
डीचे रणांत तारिख १ नवंबररोजीं लेकसाहेबास जय मिळून चंबळन-
दीचे उत्तरे कडील सर्व शिंद्याचा मुलुख कंपनी सरकारचे हातीं ला-
गला.

जनरल वेलसली साहेबाकडे आपा देसाई, बाळोजी कुंजीर, हे
दोघे शिंद्याचे तर्फे तहचें बोलणें बोलूं लागले. पण त्यांस शिंद्यां कडून
अधिकार नसल्यामुळें, वेलस्ली साहेब त्यांशीं कांहीं बोलेना, इतक्यां
त आडगांवचे मैदानांत मराठी सैन्याची वेलसली साहेबाशीं दुस
री लढाई जाहाली, त्यांत शिंद्याकडील सेनाधिकारी गोपाळराव भा
उ होता, तो पराभव पावला. नंतर येशवंतराव घोरपडे, आणि नारो
पंत, या दोघांस वेलसली साहेबाचे लष्करांत दौलतरावानें पाठवून
तहचें बोलणें लाविलें. लढाईचा खर्च आणि आयासा बद्दल वेलस

ली साहेब मुलुख मागूं लागला, तो न देतां होईल तर तह करावा,
दौलतरावाचे मनांत होतें, पण तें साधलें नाहीं. शेवटीं आपले राज
पैकीं कंपनी सरकारास मुलूख देऊन तारिख ३० दिजंबर सन १
इसवी रोजीं सरजे अंजन गाव मुक्कामीं त्यानें तह करून दि
त्यास अजंझ्याचा तह ह्मणतात. या तहनाम्यातील आशय पुढे
हिल्या प्रमाणें

१ गंगा व भागिरथी या दोन नद्यांचे मध्यभागचा मुलूख
पनी सरकारास द्यावा.

२ अहंमद नगर आणि भडोच परगणें किल्ला सुद्धां कंपनी
रकारास द्यावे.

३ दिल्लीचा बादशाहा, पेशवे, गायकवाड, आणि निजाम
चौघांवरील सर्व हक्क असतील ते दौलत रावानें सोडावे.

४ कोणी युरोपियन किंवा अमेरिकन जातीचे लोकांस शिं
नीं आपले राज्यांत कंपनीचे अनुमता वांचून ठेऊं नये. कंपनीं स
रचा रसिदेंट आपले राज्यांत शिंद्यानीं बाळगावा.

५ शिंद्यांचे खुद्द घराण्या कडे अथवा आप्तवर्गाकडे जाहागि
र चालत असेल ती परत द्यावयाची त्याचे बदल सालिना पंधरा ल
क्ष रुपये कंपनी सरकारानें द्यावे.

६ जयपूर, जोतपूर, आणि गोहद, या तीन संस्थानाचे उत्त
कडील मुलूख शिंद्यांनीं सोडून द्यावा.

७ आजंठ्याचा घाट आणि गोदा वरीचे मध्यभागचा मुलूख शि
द्यानीं कंपनीस द्यावा.

८ लढाई सुरू जाहाल्या पासून जे राजे अगर जाहागीरदार
कंपनी सरकारचे दोस्त जाहाले असतील, त्यांस पुनः शिंद्यांनीं उप
द्रव लावूं नये.

९ अशरगड, बऱ्हाणपूर, दोहद, पवनगड, हे माहाल इं
ग्रज सरकारानीं लढाईत घेतले आहेत, ते शिंद्यांस परत द्यावे.

१० ढोळपूर बारी, आणि राजखेडा हे दोन माहाल माहादजी शिं

दे यांस इनाम मिळाले आहेत ते शिंद्यांस परत मिळावे.

११ जो मुलूख या तहनाम्यावरून कंपनी सरकारास देण्यांत येई ल, त्यांत शिंद्याचे इनामी अगर वतनी गांव किंवा जमीनी असतील त्या, कंपनी सरकारानें परत द्याव्या.

रघोजी भोंसल्यानें आपले राज्यांतील कांहीं मुलूख कंपनी- स देऊन, सदरील मतलबाचा दुसरा तहनामा करून घेतला. सदरील- तहनामा कबूल करून दौलतरावानें कंपनीचे युद्धाचा समारोप केला. दौलत रावानें आपले राज्याचे रक्षणा करितां कंपनी सरकारचें कांहीं सैन्य बाळगावें, असे कंपनी सरकारचे मनांत होतें, परंतु ही गोष्ट त्या- नी दौलत रावाचे मर्जीवर ठेविली होती, जयपूर, जोतपूर, मचेरी,- भरतपूर, गोहदचा राणा, हे राजे शिंद्याचे खंडणी दार होते, त्याणीं ज- नरल लेक साहेबाशीं निरनिराळे तहनामे करून, आपले खंडणीची मा- फी करून घेऊन ते सर्व शिंद्याचे अमलां तून स्वतंत्र जाहले. अंबाजी इं- गळा गोहद प्रगण्याचा शिंद्याकडून मामलेदार होता, तो आपले धन्या शीं बेइमान होऊन लेक साहेबास मिळाला, आणि त्यानें आपले मुल खा बद्दल निराळा तहनामा करून घेतला.

अजेंठ्याचे घांटानजीक आसाई मुक्कामीं जी लढाई जाहाली त्या

सन १८०४ इसवी } पासून शिंदे व भोंसले या दोघांस नफा बिलकूल न- शके १७२६. } होतां नुकसान उभयतांचें फार जाहलें. आपला मुलु- ख देऊन कंपनी सरकाराशीं सख्य करणें प्राप्त जाहलें हें एक, बबा जीराव रघुनाथ पेशवा, आणि दिल्लीचा बादशाहा, हे दोघे दौलतरावा चे ताब्यां तून कंपनी सरकारचे कुशींत शिरले हें दुसरें, असें दुहेरी नु- कसान दौलत रावाचें जाहालें. गोहदच्या राण्या पासून गोहद प्रग- णा व ग्वालेर किल्ला महादजी शिंदेयाणीं सन १७८४ इसवींत घे- ऊन, त्याची मामलत अंबाजी इंगळ्याकडे सांगितली होती, असें असतां गोहद प्रगणा अंबाजी इंगळ्यास आणि राण्यास निमे- निम वांटून देऊन, ग्वालेर किल्ला आपले हातीं कंपनी सरकारानें ठे विला, हें फार दौलतरावास पसंत वाटलें नाहीं. कंपनीसरकारची-

फौज आपले इलारव्यांत बाळगणें किंवा न बाळगणें हें दौलत रावाचे मर्जी वर प्रथम कंपनी सरकारानें ठेविलें होतें, परंतु तारिख २७ फेब्रुआरी सन १८०४ इसवी रोजीं बऱ्हाणपूर मुक्कामीं त्यानीं त्याशीं नवा तहनामा करून फौजेची माळ त्याचे गळ्यांत घालून असें ठरविलें कीं, ही फौज कंपनी सरकार आपले मुलखांत शिंद्याचे राज्याचे सरहद्दीवर ठेवील. या फौजेचे खर्चा बद्दल कंपनी सरकारानें नवीन मुलूख वगैरे घेतला नाहीं.

शिंदे व भोंसले या दोघांचा मोड करून कंपनी सरकारानीं उभयतांस जागचे जागीं बसविलें तरी, येशवंतराव होळकराचें बंड न मोडतां ज्यास्त जोरावार होतें, त्यास भरतपूरचा राजा मिळून तोही कंपनी सरकाराशीं लढाईस तयार जाहाला. येशवंत रावानें दौलत रावास असें सांगून पाठविलें कीं, तुह्मीं कंपनी सरकाराशीं केलेला तहनामा मोडून युद्धास आरंभ करावा. इकडे येशवंत रावाचे नाशा करितां कंपनी सरकारानें दौलत रावाची कुमक मागितली होती, ती देण्याचें त्याणें कबूल केलें होतें. बापू शिंदे व सदाशिव भाऊ भास्कर यां दोघां बरोबर कांहीं फौज देऊन दोघांस येशवंत रावा विरुद्ध माळव्यांत पाठविले होते, ते कंपनी सरकारचे फौजेंत न जातां येशवंत रावाचे सैन्यांत जाऊन मिळाले. ग्वालेरचा किल्ला आपला असून गोहदचा राण्यानें आह्मांस तहनामा करून दिला, तसाच अंबाजी इंगळा व राणा या उभयतांशीं कांहीं संबंध नसतां, दोघांशीं कंपनी सरकारानें निरनिराळे तहनामे करून आपले दोस्तीत व्यत्यय आणिला आहे, त्यापेक्षां कंपनीचा पक्ष सोडून आपण येशवंत रावास मिळावें, अशी दौलत रावास सल्ला सर्जेरावानें दिली. त्यांस अंबाजी इंगळ्याचें अनुमोदन पडलें. नंतर सन १८०४ इसवी सालचे अकटूबर महिन्याचे अखेरीस दौलतराव बऱ्हाण पुराहून उज्जनीस जाण्या करितां निघाला ते समयीं जनरल जंकीन्साहेब कंपनी सरकार तर्फे त्याचे दरबारांत रसिदेंट होता. त्याचें सामान लुटून मार्गांत त्यास सर्जेरावानें कैद केला.

दौलत रावाची आणि येशवंत रावाची गांठ पडल्यावर ते दोघे (१८०५ इस.) कांहीं दिवस सख्य भावानें राजपूतना प्रांतीं फिरत अ

शके १७२७) सतां येशवंत रावाचा पक्षसोडून तुह्मीं परत उज्जनीस जावें ह्मणून दौलतरावास कंपनी सरकारचें ह्मणणें होतें. त्यानें असें उत्तर पाठविलें कीं, येशवंत रावानें आपलें बंड मोडावें ह्मणून त्यास मी बुद्धिवाद करीत आहें. मला तूर्त पैशाची अडचण फार जाहाली आहे, ती निवारण जाहाल्या खेरीज मला उज्जनीस जाऊन आपले राज्याचा बंदोबस्त करतां येत नाहीं. माझे दोन सरदार तुमचे फौजेंतून फुटून आपली फौज घेऊन येशवंत रावास मिळाले, त्यांतील कारण इतकेंच आहे कीं, तुह्मा कडून त्याचे पगाराचा व सामानाचा बंदोबस्त वक्तशीर न जाहाल्या मुळें, त्यास आपले फौजेचे उपजीविके करितां येशवंत रावाचे सैन्यांत जाऊन मिळणें भाग पडलें. तुमचे रसिदेन्टास मार्गांत लुटून आह्मीं कैद केला आहे, त्याचें नुकसान जें जाहालें असेल तें, भरून देण्यास आह्मीं राजी आहों अशा मजकुराचें एक पत्र दौलत रावानें कलकत्यास नामदार गवरनर जनरल यांजकडे पाठविलें.

भरत पूरचा राजा आणि येशवंतराव होळकर हे दोघे कंपनी सरकाराशीं वैर भावानें वागत होते, त्यांत दौलतराव सामील होतो अशी कंपनी सरकारास भीती उत्पन्न जाहाली; तेव्हां दौलत रावाचें सदरील-विपरीत वर्तना वर नजर न देतां, त्यास पैसा देऊन त्याशीं नवा तह करण्याचा कंपनी सरकारानें घाट घातला. येशवंत रावाचे सांगण्यावरून दौलत रावानें अंबाजी इंगळ्यास प्रथम कैद केला होता, पण सर्जे रावाचें अननवीत आचरण पाहून, अंबाजीस सोडून त्याचे हातीं कारभार द्यावा अशी मसलत येशवंत रावानें त्यास सांगितली. अंबाजीचे हातीं कारभार आल्यावर, सर्जे रावाची मसलत दौलत रावास नापसंत होऊं लागली. कंपनीचे तर्फे जनरल मालकम साहेब व शिंद्याचे तर्फे मुनशी कवलनयन या दोघांनीं तारिख २२ माहे नवंबर सन १८०५ इसवी रोजीं तहनामा ठरविला. त्यांतील मतलब.

१ सरजे अजन गांवीं जो तहनामा ठरला आहे, त्यांत या तहनाम्या वरून जे फेरफार होतील ते, खेरीज करून बाकी तो तहनामा कायम राहील.

२. कंपनी सरकारानें गोहदच्या राण्यास गोहद परगणा व म्याले रचा किल्ला त्याशीं तहनामा करून दिला होता, तो तहनामा रद्द करून सदरहू प्रगणा व किल्ला दौलतराव महाराजांस देण्याचें कंपनी सरकार कबूल करीत आहे.

३. गोहदच्या राण्याचा बंदोबस्त कंपनी सरकारानें करावा. त्याचे बद्दल ढोळपुबारी व राजखेडा हे दोन महाल शिंद्यानीं परत कंपनी सरकारास द्यावे, पंधरा लक्ष रुपये शिंद्याचे पदरचे लोकांस पेनशन देण्याचें जें कंपनी सरकारानें कबूल केलें आहे, तें शिंद्यानीं सोडावे.

४. बेडग, आणि ऋशीपुरा, हे दोन महाल शिंद्यानीं कंपनीस द्यावे. चंबल नदी कंपनी सरकारचे आणि शिंद्याचे मुलखाची सरहद्द समजावी.

५ दौलतराव महाराजास सालिना चार लक्ष रुपये पेनशन, व त्यांचे पत्नीस दोन लक्षाची, व मुलीस एक लक्षाची, एकूण तीन लक्षांची जाहागीर आणि चार लक्ष रुपये नक्त दरसाल कंपनी सरकारांतून पावतील व जाहागीर नेमून देण्यांत येईल.

६. चंबल नदीचे उत्तरेस अगर कोट्याचे पूर्वेस जे संस्थानिक असतील त्यांवरील हरएक प्रकारचे शिंदे सरकारचे दावे असतील ते शिंद्यानीं सोडून बुंदीचे राज्या वरील कर सोडून द्यावा.

७. जोतपूर, उदेपूर, कोटा, याशिवाय माळवा, मेवाड, मारवाड यातीन प्रांतांत जे शिंद्यांचे खंडणीदार असतील, त्याशीं कंपणी सरकार तहनामे करणार नाहीं, व शिंद्याचे व सदरील संस्थानिकाचे जे करार जाहाले असतील, त्यांत कंपनी सरकार हात घालणार नाहीं.

८. होळकराचा आणि कंपनीचा तह जाहाला असतां, चंबल व तापीनदीचे दरम्यानचा होळकराचा जो मुलुख शिंद्यानीं घेतला असेल, तो परत होळकरास देण्या विशीं कंपनी सरकार आग्रह करणार नाहीं.

९. रसिदेन्यास कैदेंतून सोडून द्यावें, त्याचे खासगी व सरकारी जें नुकसान या कैदे मुळें जाहालें असेल तें, शिंद्यानीं भरून द्यावें, सरजेराव घाटगे फार दिवसा पासून कंपनी सरकाराशीं वैर भावानें

वागत आहेत, व त्याचे मसलतीनें शिंदेयानीं रसिदेन्टास कैद केला, या स्तव घाटग्यास सरकारी कामातून शिंद्यानीं काढावा.

सदरीं लिहिले प्रमाणें तह जाहाल्यावर दौलतरावाचे राज्यांत कां- (सन १८०८इ.) हीं काळ परयंत स्वस्तता होती, उदेपूरचे राजाची कन्या कृष्णा कुमारी रूपानें अतिशय लावण्य होती. जयपूर व जोतपूर चे राजे कृष्णा कुमारी प्राप्त व्हावी ह्मणून परस्परांशीं लढूं लागले, तेव्हां जोतपूरचे राजानें शिंद्याकडील कुमक मागितली. त्याचे मदतीस सर्जेराव घाटगे व बापुशिंदे हे दोन सरदार कांहीं फौज घेऊन गेले होते. या मुलीचे पाई आपलें राज्य जाईल असें तिचे पित्यास वाटून त्यानें तीस ठार मारून आपल्या वरील संकट टाळलें.

दौलत रावाजवळ फौज फार होती, ती त्यानें युद्ध प्रसंग सं- (सन १८०९ इ. शके १७३१.) पल्यावर कमी केली नाहीं, तिचे पगाराची दररोज फौजेंतील अधिकाऱ्यांचे घरोघर धरणीं बसूं लागलीं: दौलतरावाचे जातीचे खर्चास देखील सावकार पैसा देण्यास मागें पुढें करूं लागले, तेव्हां कंपनी सरकारांतून सालिना सात लक्ष रुपये त्यास पावत होते, त्या तारणावर सावकारां कडून त्याणें कर्ज काढलें. त्याचे ताब्यांतील किती एक खंडणीदार, व जमीदार लोक, त्यास वसुलाचा पैसा सुरळीत देत नवते, तो वसूल करण्या करितां त्याणें माहालांतून ही फौज पाठवून दिली. तिणें मारा हाणा लूट आरंभिली तणें करून सर्व राज्यांत स्वस्तता नाहींशी होऊन, दंगा सुरु जाहाला. येशवंत राव होळकराचें कंपनी सरकाराशीं जें युद्ध चाललें होतें तें नुकतेंच समाप्त जाहालें होतें, या मुळें माळव्यांत दंगाचा लूं होता. शिंदे, होळकराचे राज्याची सरहद्द जवळ असल्यामुळें, दोन्ही राज्यांत स्वस्तता नाहींशी जाहाली. पेशवे, भोंसले, शिंदे, होळकर, यांचे फौजेंत एकपट शिपाई असून तिप्पट चोरटे व लुटारू लोक असत, या लोकांस पगार द्यावा लागत नसे, ते फौजे बरोबर स्वारीस जाऊन प्रांतांतून निरधास्त पणें लूट चालवीत असत या लोकांस बाजार बुणगे अगर पेंढारी लोक असें नांव पडलें होतें. त्यापें-

दारी लोकांस पगार द्यावा लागत नसून त्यांचा भरणा पाहून शत्रूनें दबकावें, अथवा शत्रूचा मोड जाहाला असतां त्यास लुटण्यास या लोकांचे हातून फार मदत होत असे ह्मणून वरील च्यारी सरदारानीं आपले राज्यांतून या लोकांस आश्रय दिला होता. कंपनी सरकारानें चौघांशीं तहनामे करून चौघांस ही जागचे जागीं बसविले, तेव्हां त्या पेंढारी फौजेचा निर्वाहा चालण्यास संकट पडूं लागलें, तेव्हां पेंढारीलोक या मराठी सरदारांचे आणि कंपनी सरकारचे मुलखांत लूटक करूं लाग. ले. अमीर खान आणि चित्तु असे या पेंढारी लोकांचे दोन प्रसिद्ध सरदार होते.

गोहद प्रगणा, ग्वालेर किल्ला, फार दिवस अंबाजी इंगळ्याचे ताब्यांत होता. अंबाजी जिवंत असतां या प्रगण्यांत शिंद्याचें ठाणें त्याणे बसूं दिलें नाहीं तो मेल्यावर या सालांत दौलतरावानें आपले फौजेचा डेरा ग्वालेरीनजीक प्रथम दिला. आपली छावणी येथें कायम करून तो कितीएक दिवस पर्यंत यात्रेस, स्वारीस जात असे, त्यापासून ही वसाहात होण्यास आरंभ जाहाला आणि तिचें नांव लष्कर पडलें.

सन १८१० इ.
शके १७३२

सरजेराव घाटग्यास सरकारी कामांत घेऊं नये असा कंपनी सरकारानें दौलत रावास प्रतिबंध केला होता. दौलत रावाचें आणि कंपनी सरकारचें सख्य जाहाल्यावर, सरजे रावाचे मनाईत कंपनी सरकारानें कांहीं रहीमनजर ठेविली, तेव्हां तो कामांत पुनः ढवळा ढवळ करूं लागला. वाटारचा निंबाळकर दौलतरावाचे पदरीं एक मराठी सरदार होता, त्यास कांहीं जाहागीर अथवा नेमणूक ज्यास्त करून द्यावी, ह्मणून सरजे रावाचे मनांत होतें, त्यानें दौलत रावास ही गोष्ट सांगितल्यावर कांहीं एक जबाब न देतां दौलतराव उठून जाऊं लागला, तेव्हां सर्जेराव त्याचा शेला धरून हें काम आज झालें पाहिजे ह्मणून खेंचून बसवूं लागला; तेसमयीं मानाजी फांकड्याचा मुलगा अनंदराव जवळ होता. सरजे रावाची उध्धट वर्तणूक दौलतरावास सहन होत नाहीं असें पाहून, आनंद रावानें सरजे रावाचे पोटांत जंब्या मारला तेणेंकरून तो मरण पावला.

सर्जेराव आपले बुधीचे योगानें उदयास आला, तो स्वभावानें फार क्रूर होता दौलत रावाचे राज्याचा कारभार त्यास प्राप्त जाहाल्यावर, त्या-

नें आपले एकंदर दुर्गुणाची तृप्ती करून घेतली. शिंद्याचे राज्यास अपाय आणि नुकसान होण्याचा समय प्राप्त जाहाला, तेव्हां सर्जे रावानें आगम न या दरबारांत जाहालें. दौलत रावास राज्य मिळाल्या पासून शिंद्याचे दौलतीस एक कवडीचा फायदा न होतां उलटें नुकसान फार जाहालें, याचा दोष सर्जे रावाचे माथीं ठेविला पाहिजे, कारण दौलतराव तरुण आणि अज्ञान असल्यामुळें आपले सासऱ्याचे छंदानें तो वागत होता. कोणी मेला असतां त्याची चांगली अथवा वाईट कीर्ति मागें लोक गातात. सर्जे रावानें आपले दुर्गुणाचा लौकीक जागोजागीं करून ठेविला आहे. दया, क्षमा, शांती, आणि सत्य हे सद्गुण शिंद्याचे राज्यांतून त्यानें आपले कारकीर्दीस अस्तास घालविलें होते, असे ह्मटल्या वांचून राहावत नाहीं.

नागपुरा पासून कर्नाटक प्रांता पर्यंत, पेंढारी लोकांचा दंगा चालू जाहाला, त्याचा बंदोबस्त शिंदे, होळकर, पेशवे, व भोंसले हे कोणीच करीनात, तेव्हां कंपनी सरकारचे मुलखांत उपद्रव होऊं लागला. कंपनी सरकारानें पेंढाराचा नाश करावयाचें मनांत आणून आपली फौज तयार केली, व वरील चौघां सरदारां पाशीं त्याची फौज ही कुमकेस मागितली. शिंद्याचे राज्यांत पेंढारी लोकांची वस्ति होती, त्या लोकांस आपले मुलखांतून काढून देण्याची तजबीज दौलत राव करिना, तेव्हां कंपनी सर कारानें या पेंढारी लोकांस तुह्मीं आश्रय देतां हें चांगलें नाहीं, ह्मणून त्यास दोष लाविला. नेपाळचा गुरखी राजा कंपनी सरकाराशीं बिघडला होता त्यास आतून फुस देण्याचे काम दौलत रावानें चालविलें होतें. पेंढार मोडण्याचे निमित्त काढून कंपनी सरकार आमचे मुलखांतून या लोकांचा पाठलाग करणार आहे, तेव्हां कदाचित त्यानीं आपले राज्यावर झडप टाकल्यास, आपण तरी सावध असावें, ह्मणून पेशवे, शिंदे, वगैरे सरदार, आपआपले ठिकाणी तयारी करूं लागले. तों कंपनी सरकारास विपरीत वाटून, त्यानी पेंढार मोडून तुमचे व आमचे मुलखांत स्वस्थता करावी, या पलीकडे या तयारीचा उद्देश नाहीं, ह्मणून सर्व मराठे सरदारास कळविलें तथापि त्यांची खात्री होईना.

सन १८१७ इ.
शके १७३९

त आमचे ताब्यांत राहावी, तिच्या पगाराकरितां तुमचें पेनशन, व जौनपूर आणि बुंदिचे राज्याकडील तुमचा खंडणीचा ऐवज, कंपनी सरकार घेनजाईल, या शिवाय हांडीया आशरगड हे दोन तुमचे किल्ले आमचे ताब्यांत तारण असावें, किल्यावर तुमचा बाव्हटा व शिबंदि राहिल्यास हरकत नाहीं. पेंढारी लोकांनीं जो तुमचा मुलुख घेतला असेल, तो तुह्मास परत देऊं, याप्रमाणें तारिख ५ नवंबर सन १८१७ रोजीं कंपनी सरकारानें दौलत रावाशीं तहनामा करून, त्याची फौज मदतीस घेतली. हांडी याचा किल्ला कंपनी सरकाराचे ताब्यांत आला, पण अशारगडचा किल्ला तेथील किल्लेदारानें कंपनीचे ताब्यांत दिला नाहीं.

बापु शिंदा, येशवंतराव भाऊ, आणि ज्यान बतीस, असे शिंद्याचे पदरचे तीन सरदार तीन फौजेच्या टोळ्या घेऊन निरनिराळे ठाण्यावर होते. तिघांस कंपनी सरकारचे अधिकारी याचे हुकुमांत तुह्मी वर्तावें असा दौलत रावानें हुकूम दिला होता. येशवंत राव भाऊ जावदचे छावणी वर होता. त्याणें कंपनी सरकारचे अमलदारासन जुमानतां चित्तु नावाचे प्रसिद्ध पेंढारी सरदारास आपले लष्करांत आश्रय दिला. तेव्हां जावदनें गणें कंपनी सरकारचे अंमलदारानें येशवंत रावा पासून लढून घेतले. आणि चित्तु पेंढारी अशारगडाकडे पळून गेला.

नागपूर येथील आपासाहेब भोंसले, आणि बाजीराव रघुनाथ पेशवे, हे दोघे कंपनी सरकाराशीं बिघडून मुलखांतून पळतहिंडत होते. त्याचे पाठलागावर कंपनी कडील सैन्य फिरत असतां, दोघांस ही दौलतरावाचे आश्रयाची आशा होती. चित्तु पेंढारी वाघानें मारला, त्याचे दुसरे सोबती पेंढारी सरदार कंपनी सरकारास शरण गेले, येणें करून पेंढारी लोकांचे बंडाचा समूळ नाश जाहला. आपासाहेब भोंसले शिखांचे मुलखांत पळून गेला. बाजीराव रघुनाथ तारिख ३ जुलै सन १८१८ रोजीं महू मुक्कामीं माल्कम साहेबास श-

सन १८१८
शके १७४०

रण गेलेला पेशवा, भोसले आणि पेंढारी या तिघांनीं जें कंपनी सरकारा विरुद्ध एकदम काहूर उचलले होतें तें पावसाचे ढगा प्रमाणें एक क्षणांत वितळून गेलें. बाजीराव रघुनाथ पळत असतां त्याणें दौलतरावास एक पत्र* पाठविलें होतें तें अकबरीवरून येथें उतरून घेतलें आहे.

अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री दौलतराव शिंदे गोसावी यांस

स्नेहांकित बाजीराव रघुनाथ प्रधान अनेक आशिर्वाद विशेष, तुमचे तीर्थरूपानीं स्वामिसेवा एकनिष्ठपणें करून दिल्लीची वजीरी संपादन करून ते जगविख्यात होऊन गेले. त्याचे चिरंजीव तुह्मीं असून कंपनी सरकाराशीं स्नेह करून आह्माशीं कृतघ्न झालां, हें करणें तुह्मास उचित नाहीं. यापेक्षां तुह्मीं बांगड्या भरल्या असत्या तर बरें जाहलें असतें. आह्मांवर तूर्त प्रसंग गुदरला आहेच, आतां तुमचें ऐश्वर्य कायम राहाणें कठीण दिसतें कळावें हे आशिर्वाद.

हें पत्र वाचल्यावर त्यास कांहीं विस्मय वाटला, शेवटीं पेशव्याचा पक्ष सोडून त्यानें कंपनीसरकाराशी आपली दोस्ती कायम ठेविली. खानदेशांतील कांहीं मुलुख त्यानें आपले फौजेचे पगारा करितां व पेंढारी लोकांचे नाशा करितां कंपनी सरकारांत अमानत ठेविला होता. शिंद्याचे फौजेस कंपनी सरकारानें पगार दिला होता, त्याचे बदला सदरील मुलूख कंपनीनें आपले ताब्यांत ठेविला. अशीरगडचा किल्लेदार येशवंतराव लाड कंपनी सरकारास किल्ला देईना, तेव्हां कंपनी सरकारानें तो किल्ला लढून घेण्याची तयारी केली, तेव्हां त्यानें तारिख ९ एप्रील सन १८१९ इसवी रोजीं त्यांचे स्वाधीन केला. त्या किल्ल्यांत आपासाहेब भोसला लपून बसला असेल, असा कंपनीसरकारचे अमलदारास संशय येऊन त्यांणीं सर्व किल्ल्याचा झाडा घेतला, तेव्हां या किल्ल्यांत बाजीराव आला असतां त्यास आश्रय द्यावा ह्मणून दौलतरावानें येशवंतरावास पत्र पाठविलें होतें तें कंपनीचे अमलदारास सांपडलें.

सन १८१९ इसवी.
शके १७४१

---

* हें पत्र माल्कम साहेबाचे मध्यहिंदुस्थानचे इतिहासांतून उतरून घेतलें आहे.

शके १७४९. ∫ कारची सार्वभौम सत्ता आहे असें दौलत रावास समजून पुढें त्या सरकाराशीं इमानें इतबारें वागत गेला, ह्मणून कंपनी सरकारानें त्याचा मानमरातब चांगला ठेविला होता, त्यास कांहीं रोग होऊन ग्वालेर मुक्कामीं तारिख २१ मार्च रोजी ×मरण पावला, ते समयीं त्याचें वय ४८ वर्षांचें होतें. त्याची छत्री ग्वालेर मुक्कामीं बांधली असून तीस साठिंना दाहा हजार रुपये खर्चाची नेमणूक आहे, त्यास औरस पुत्र जाहाला नाहीं ह्मणून तो दत्तक घेण्याचा यत्न जिवंत असतां करीत होता, पण तो हयात असतां कंपनीसरकारानें दत्तक घेण्याची त्यास परवानगी दिली नाहीं.

आपले कुलाचा आणि राज्याचा अभिमान व इतर गुण जसे औरस पुत्रास साहाजिक प्राप्त होतात, ते दत्तकास ओढून आणावे लागतात. महादजी बावाची आणि दौलत रावाची तुलना केली असतां, उभयतांत जमीन असमान इतका फरक दिसतो, जें महादजी बावानें मिळविलें तें दौलतरावाचे हातून रक्षण जाहलें नाहीं. आपले अफाट राज्याचा आणि फौजेचा गर्वानें मन मानेल तसा तो आपले सासऱ्याचे छंदानें वागूं लागला, तेणे करून निमे राज्य कंपनी सरकारास अर्पण करून आपले स्वातंत्र्यास मुकावें लागलें. माहादजी बावाचे कारकीर्दिस शिंद्याचे दरबाराची दहशत आणि दरारा जो दुसरे लोकांचे दरबारांत बसला होता, तो याचे कारकीर्दिस नाहींसा होऊन गेला.

अल्पवयांत विद्याभ्यास आणि तारुण्य दशेंत संगत जशी एकादे मनुष्यास प्राप्त होते, तदनुसार तो मनुष्य पुढें चांगला वाईट होतो. दौलतरावास विद्याभ्यास जाहला होता किंवा नाहीं हें सांगवत नाहीं, पण तरुण दशेंत अधिकार प्राप्त जाहाल्यावर बाजीराव रघुनाथ पेशवे आणि सर्जेराव घाटगे या दोघांचा अतिशय सहवास त्यास होता. उभयतांचे संगती पासून नफा तोटा किती जाहाला हें प्रौढ दशेंत त्यास समजूं लागलें, तेव्हां पासून आपले राज्याचे आबादी करितां तो झटूं लागला. कोणतेही

× [illegible] शके १७४८

नुष्यास कसाहि अधिकार प्राप्त झाला असतां, तो मनुष्य त्या अधिकारा चे गादीवर बसला ह्मणजे ततसंबधी जीं कर्तव्य कर्मे असतात तीं आपो- आप त्या मनुष्याचे अंगीं संचारतात, अशी आमचे लोकांची दृढतर समजूत पडून गादी काम शिकविते अशी ह्मण देखील जाहाली आहे. बाजी राव रघुनाथ, दौलतराव, व सरजेराव घाटगे या त्रिवर्गाचे आचरणाचा विचार केलातर वरील ह्मण किती अप्रयोजक आहे हें सहज दिसून येईल.

दौलत रावाचे हातून ज्याचुक्या जाहाल्या त्याचा दोष बाजीराव आणि सरजेराव या दोघांवर घालणें वाजवी दिसतें, कारण तो दोघांचे मसलतीनें वागत होता. बाजीरावाची अवस्था नदींत बुडणाऱ्या माणसा सारखी जाहाली होती. बुडत्या मनुष्यास बाहेर काढण्याचें काम फारजोखिमीचें आणि जिवावरचें असतें. तो वसईच्या तहा पासून इंग्रजी भोंवऱ्यांत सांपडला होता, त्यांतून बाहेर पडण्या साठीं त्याणें दौलतरावास मदतीस घेतला. या मदतीचा परिणाम काय होईल हें दौलतरावाचे लक्षांत आलें नाहीं, शेवटीं बाजीराव आपल्या राज्यास मुकला आणि शिंद्यांचें राज्य मोठ्या प्रयासानें रक्षण जाहलें.

---

## सन १८[illegible] इसवी [illegible] पासून

## सन १८७२ इसवी शके १७९३ पर्यंत.

# जनकोजी व जयाजी महाराज.

महादजी बावाचे वेळेस जो शिंद्याचे मुलखाचा विस्तार होता, त्या पैकीं[+] दोन त्रितीयांश मुलुख दौलतरावाचे कारकीर्दीस कंपनी सरकारानें घेतला, बाकी एक त्रितीयांश मुलुख त्याचे मरण काळीं त्याचे हातीं राहिला होता. दौलतरावास एक मुलगी होती, तिचें नाव चिमणाबाई तिची मुलगी मुरवत रावास दिली होती, त्यास कंपनी सरकारचे परवानगीनें तारिख १८ जून सन १८२७ इसवी रोजीं बायजा बाईनें आपले मांडीवर दत्तक घेऊन, त्याचें नांव जनकोजी राव ठेविलें, ते समयीं त्याचें वय ११ वर्षाचें होतें. बायजा बाईस राज्य कारभाराची मुळा पासून फारहौस होती, ती अनायासें पूर्ण होण्याचा समय आला. अजंठ्याचे घाटांत जो तहनामा झाला त्या प्रमाणें दौलतराव हयात असतां, त्याचे हातून कंपनी सरकारास कांहीं मुलुख मिळाला नाहीं, तो आह्मास द्यावा ह्मणून कंपनी सरकारनें ह्मणणें पडलें. तेव्हां बायजा बाईनें तो मुलुख देण्याचें कबूल केलें. जनकोजी राव अज्ञान आहेत तों पर्यंत बायजा बाईनें कारभार करावा असें कंपनीसरकारानें ठरवून तिचे हवालीं राजकारभार केला.

(सन १८२७ इसवी, शके १७४९.)

जनकोजी रावाचा व बायजा बाईचा बेबनाव होऊन, दरबारांतील मंडळींत दुफळी होऊन राजकारभाराची ओढाताण होऊं लागली. औरस संतती नसल्यास दत्तक मुलगा घेण्याची चाल आमचे लोकांत फार आहे. ज्या कुळांत मुलगा दत्तक होऊन मालक होतो तों त्या कुळांतील लोकाशीं स्नेह भावानें न वागतां वैर उत्पन्न क

(सन १८३४ इसवी, शके १७५६.)

---

+ शिंद्याचे राज्य तीन कोटीचें होतें असें सांगतात ही गोष्ट खरी असेल असें वाटते.



जनकोजी महाराज.

रतो. सर्व दत्त पुत्र बहुधा दत्तक घेणारे मनुष्यास अथवा कुलास परिणामीं त्रास दायक होतात, एखादा त्या कुलाचे क्षयास कारण होतो. शिंद्याचे दरबारांतील राज कारभाराचे ओढा ताणी कडे कंपनी सरकारानें कांहीं काळ पर्यंत लक्ष दिलें नाहीं, त्यास असें वाटत होतें कीं, बायजाबाई व जनकोजी राव उभयतां आपसांत समजून कांहींतरी व्यवस्था करतील, पण तसें न होतां बायजा बाईचे हातून सक्तीनें कारभार काढून जनकोजीरावाचे हातीं कंपनी सरकारानें दिला.

आमचे लोकांतील स्त्रिया अशिक्षीत असतात, यामुळें साधारण गृह कृत्यांत देखील त्यास स्वतंत्र अधिकार नसतो, मग त्याचे हातीं राज कार भार देण्याचे कोणाचे स्वप्नांत देखील यावयाचें नाहीं. होळकराचे राज्याचा कारभार अहिल्याबाईचे हातीं प्राचीनकाळीं फार वर्षे होता, तिचे कारकीर्दीचा चांगुलपणा होळकराची रयत गात होती यांत आश्चर्य नाहीं, पण त्या साधवीचा लौकीक सर्व हिंदुस्थानभर पसरला होता. आई बापाचे अंगीं जे गुण अथवा दुर्गुण असतात, ते त्याचे संततीचे अंगीं बहुधा उमटतात. सर्जेराव घाटग्याचे किती एक गुण बायजा बाईचे अंगीं होते, तिचे कार कीर्दीस तिचे बापाचें स्मरण लोकांस वारंवार होत होतें. जनकोजी रावाचे हातीं राजसत्ता गेल्यावर ती कांहीं दिवस तीर्थयात्रे करितां बाहेर हिंडत होती. अहिल्या बाई आणि बायजा बाई त्या दोघी कांहीं दिवस राज्य कार भार करीत होत्या. अहिल्या बाईचे कारकीर्दीत जसें प्रजेस सुख जाहलें तसें बायजा बाईचे कार कीर्दीत जाहलें नाहीं इतकेंच नाहीं, पण तिचे क्रूर स्वभावाची भीती लोकांस रात्रंदिवस वाघवाघी लागत होती.

जनकोजीराव पंधरा वर्षे राज्य करून अल्प वयांत तारिख ७ फेब्रुआरी सन १८४३ रोजीं मरण पावला त्याचे कारकीर्दीत विशेष घालमेल जाहाली नाहीं, म्हणून त्याचे गुणाव गुणा विषयीं कांहीं लिहितां येत नाहीं. कृष्णाराव कदम सातार इलाख्यांत मौजे साप गावीं राहाणारा असून, तो जनकोजी रावाचा मामा अस-

(इसवी सन १८४३ / शके १७६५ — margin note)

माघ शुद्ध ८ शके १७६४ संवत १८९९.

त्या कारणानें त्यास मामा साहेब ह्मणत होते. जनकोजी रावाचे कारकीर्दींत मामा साहेब सर्व राज्य कारभार चालवीत होता. जनकोजीरावाचे भाउबंदांचे घराण्यांत हणमंत रावास भगीरथ राव नावाचा मुलगा होता, त्यास मामा साहेबानें आपली मुलगी लग्न लाऊन दिली होती. जनकोजीराव मरण पावला तेसमयीं त्याची बायको तारा बाई बारा वर्षांची होती. कंपनीसरकारचे आज्ञेवरून तिचे मांडीवर भगीरथ रावास तारिख १९ फेब्रुवारी सन १८४३ इसवी रोजीं दत्तक* देऊन, नाव जयाजीराव ठेविलें तेवेळेस त्याचें वय आठवर्षांचें होतें.

जयाजी राव अज्ञान आहे तोंपर्यंत मामा साहेबांनीं सर्व राजकारभार पहावा, असें ताराबाईचे व इतर सरदारांचे मनांत होतें, ही गोष्ट कंपनी सरकारास पसंत होऊन मामा साहेबाचे हातीं कारभार आला. गांवचे वस्तीस जसा म्हारवडा असतो, तसें राज्य मोठें अथवा लाहान असलें तरीं, त्यांतील सरदार मुत्सद्दी मंडळींत दुफळी असते. मामा साहेबाचे हातीं राजसत्ता गेली हें त्याचे विरुद्ध पक्षांतील लोकांस बरें वाटलें नाहीं, त्याचे विरुद्ध पक्षांत जे लोक होते त्यांत दादा खासगीवाले प्रमुख होता. त्यानें ताराबाईचें आर्जव करून तिची मर्जी संपादन केली. सुधारलेले व शाहाणे राज्यांत कायदेकानूनें जसा राजकारभारास प्रतिबंध केलेला असतो, तसा आमचे राज्यांतून प्रतिबंध नसून राजाचे मर्जीनें कला प्रमाणें राजकारभार चालतो, ह्या कल धरण्याचें ज्यास चांगलें ज्ञान असतें तोच मनुष्य मोठे योग्यतेस चढतो. घोड्यास देवमणी असला ह्मणजे, त्याचे अंगीं दुसऱ्या बाहात्तर खोडी असल्या तरी निभावल्या जातात. तसेंच आमचे राज्यांतून एक मर्जी संपादन करतां आली ह्मणजे, इतर गुणांचा अभाव असला तरी खपला जाऊन शहाणा नाहीं, पण त्या गुणानें तो मनुष्य नाना फडणिसाचे योग्यतेस चढतो.

---

* सांप्रतचा मामा साहेबांचा वाडा किल्ल्यासारखा बांधलेला आहे त्याचे हातारवाळी (शिवाजीपंत शेंडेकर एकदा) रहून होता. शिंदे सरकारचे गंगाजळींत (जामदारखान्यांत) या उपटांची फार पाळमेच केली असा लौकीक आहे.

* माघ वद्य ९ शके १७६५ संवत १८९९

मामासाहेब जयाजी महाराजांचे सासरे आहेत,या योगानें त्यां-चें वर्चस्व होऊन तुमचा पाणउतारा होत जाईल. याजकरितां त्याचे हातचा कारभार काढून तुह्मी आपले हातीं घ्यावा,असें दादा खासगीवाल्यानें तारा बाईचे मनांत भासविलें.आधीच बायकोची जात,त्यांत तरुण असल्यामुळें,ती खासगीं वाल्याचे पाशांत सांपडून याचे नादानें वागूं लागली.तेव्हां मामासाहेब आपला कारभार सोडून कंपनी सरकारचे छावणीत निघून गेला,त्यास परत पाठवावे ह्मणून तारा बाईनें रसिदेन्ट्यस लिहिलें,तेव्हां रसिदेन्ट साहेबांनीं असा जबाब पाठविला कीं, दादा खासगीवाल्यास तुह्मीं हद्दपार हांकून लावल्या खेरीज मामा साहेब परत येणार नाहींत. हा रसिदेन्ट साहेबाचा लेख तारा बाईस नकळवितां दादा खासगी वाल्यानें मध्येंच दाबून ठेविला. जयाजी महाराज, व तारा बाई या उभयतांचे जिवाचे आणि शिंद्याचे राज्याचे रक्षणाची जोखीम कंपनी सरकारचे माथीं असल्यामुळें,दादा खासगी वाल्याची फीसाद मोडण्यास कंपनी सरकारास प्रवर्त ह्वावें लागलें. या प्रसंगीं ते पुढारी होऊन ही फिसाद न मोडते तर शिंद्याचे राज्याची काय दशा जाहाली असती. हें सांगवत नाहीं.

नेटीव संस्थानिकांस औरस पुत्र नसेल तर,तें संस्थान खालसा करावें असा क्रम कंपनी सरकारानें त्याकाळीं नुकताच आरंभला होता. जनकोजी रावास औरस पुत्र नाहीं या निमित्यानें हें राज्य कदाचित् खालसा जाहालें असतें,पण सिंध मुलखाचे अमीराचे राज्य कंपनी सरकारचे हातीं नुकतेंच लागलें होतें,ह्मणून शिंद्याचे राज्यावर खैर जाहाली. त्याठेकाणील बंडाचें वर्तमान समजल्यावर,त्याचे बंदोबस्ता करितां कलकत्याहून नामदार गवरनर जनरल साहेब स्वतः कांहीं सैन्यासह वर्तमान हिंगोण्यास आले,त्याचे भेटीस बापू शितोळे दरबारांतून गेले होते.त्यास नामदार साहेबानीं असें सांगितलें कीं, दादा खासगीवाले व त्याचे पक्षांतील जे लोक असतील,त्या सर्वांस आमचे स्वाधीन करावें, मामा साहेबाचे हातीं पूर्ववत कारभार द्यावा, जे लोक शिंदे सरकारचे कह्यांत राहणार नसतील त्यांस बरतर्फ करावें. शिंदे व कंपनी सरका

रचे सरहद्दी वरील कांहीं मुलुखाचा मोबदला द्यावा. बापू शितोळा यानें गवरन रजनरल साहेबाचे सर्व करार कबूल करून, तारा बाई व जयाजी राव या उभयतानीं नामदार साहेबाचे भेटीस त्याचे छावणीत जावें असें ठरविलें होतें.

तारिख २६ दीजंबर रोजीं हींगोण्यास जाण्या करितां तारा बाई व जयाजी राव निघाले असून त्यास दरबारांतील लोकांनी अडविलें. गवरनर जनरल याचें सर्व ह्मणणें कबूल केलें तरीं, दरबारची स्वतंत्रता नाहींशी होऊन पदरचे लोकांचा व फौजेचा समूळ नाश होणार, तो नव्हावा ह्मणून कंपनी सरकाराशीं युद्धाचा उपाय दरबारांतील लोकांनीं योजला. युद्धाची तयारी होईपर्यंत गवरनरजनरल याजकडे सख्य करण्याचें बोलणें चालविलें होतें, या बोलण्याचे नादावर गवरनर जनरल यास ठेऊन, त्याचे फौजेवर एका एकीं हल्ला करावा अशी मसलत शिंद्यांचे दरबारांतील लोकांनीं योजली होती, पण ती साधली नाहीं. शत्रू कपटानें जिंकावा असा प्राचीन कालचे युद्धनीतीत नियम आहे. हा नियम कितीएक प्रसंगीं प्राचीन कालचे राज्यानी चालवून ते विजयी होऊन गेले. तो नियम सांप्रत कालचे युद्ध प्रसंगांत चालविला असतां साधत नाहीं.

सन १८४३ इसवी. शके १७६५

शिंद्यांचे दरबारांत लढाईची तयारी होत आहे असें वर्तमान नामदार गवरनर जनरल यास समजल्यावर, त्याणें हिंगोण्याहून आपले फौजेस कुच करण्याचा हुकूम दिला. कोहीनूर नदी तारिख २९ दिजंबर रोजीं उतरून माहाराजपूरचे नजीक त्याणें आपले फौजेचा तळ दिला. त्याचे आदले दिवशीं चांगले माऱ्याचें स्थळ पाहून शिंद्याकडील फौज उतरली होती. त्या फौजेवर कंपनीचे सैन्यानें हल्ला केला ते त्यांचें सैन्य गावांत शिरलें नंतर उलट खाऊन त्यानीं कंपनीचे सैन्यावर मारा केला त्यांत कंपनीच्या फौजेचा फार नाश जाहाला, तथापि शिंद्याकडील २८ तोफा त्याचे हातीं सांपडून त्यास जय मिळाला.

सन १८४३ इसवी. शके १७६५.

मेजरग्रे एक फौजेची टोळी घेऊन तारिख २९ दिजंबर रोजी आपले फौजेस मदत करण्या करितां येत होता. शिंद्याची बाराहजार फौज त्या टोळीस अडविण्याकरितां पानगडावर राहिली होती. एका बाजूनें मेजरग्रे व दुसरे बाजूनें सेनापती असे

सन १८४३ इसवी. शके १७६५.

दोघांनीं एक काळीं च्यार वाजतां मानगडचे छावणी वर दोही कडून हल्ला केला, त्यांत शिंद्यांकडील फौज मध्यभागीं सांपडून नाश पावली. सकाळीं महाराजपूर, आणि सायंकाळीं पुनीयार, अशा दोन लढाया जाहाल्या त्यांत दोन्ही प्रसंगीं शिंद्यांचे सैन्यास अपजय आले. कंपनी सरकारचे सैन्या पेक्षां शिंद्यांची फौज फार होती. आपले सैन्याचा डामडौल पाहून दरबारांतील लोक युद्धाचा प्रसंग आणणार नाहींत, असें नामदार गवरनर जनरल साहेबास वाटत होतें, पण तें घडलें नाहीं. वरील दोनी लढायांत जरी शिंद्यांचे पक्षास अपजय आला, तथापि मराठे लोकांचें युद्ध तारकिक आणि शौर्य नामदार गवरनर जनरल यांस चांगले समजून आलें.

दोन्ही लढायांत अपजय आल्यावर दरबारांतील सर्व सरदार व मुत्सद्दी मंडळीस मोठी भीती आणि काळजी प्राप्त जाहाली. नामदार गवरनर जनरल साहेबांनीं मोठी सभा करून जंयाजी महाराजास पुनः राज्यावर स्थापन केलें. महाराज सज्ञान होई पर्यंत राज कारभार चालविण्यास एक सभा* नेमलि होती, महाराजास राज्यावर बसविण्या पूर्वीं कंपनी व शिंदे सरकारचा एक नवा तहनामा जाहला त्यांतील मतलब.

इसवी सन १८४४. शके १७६५.

१ शिंदे सरकारचे राज्याचे रक्षणास जी कंपनी सरकारानें फौज ठेविली आहे, तीस कंटिंजंट ह्मणतात. या फौजेचे खर्चास अठरा लक्षाचा मुलूख कंपनी सरकारास नेमून द्यावा.

२ हल्लीचे लढाईचे खर्चा बद्दल व पहिले कर्जा बद्दल आणखी मुलूख नेमून द्यावा.

३ साहा हजार स्वार, तीन हजार पायदळ, बत्तीस तोफा आणि दोनशें गोलंदाज इतकी फौज शिंदे सरकारानें बाळगावी ज्यास्त असेल ती कमी करावी.

---

* या सभेंत मुत्सद्दी होते त्यांचीं नावें :— १ रामराव फाळके बाहादूर समशेर जंग (आध्यक्ष). १ देवराव जाधव मामासाहेब. १ धीरउद्दौला मुनशी राजे बळवंतराव बाहादर. १ उदाजी राव घाटगे. १ सुल्लाजी. १ नारायण राव भाऊ यमाजी पोतनीस.

या प्रमाणें तहनामा जाहाल्यावर ग्वालेर संस्थानाचा बंदोबस्त करून, नाम
दार गवरनर जनरल साहेब परत कलकत्यास गेले. जयाजी राव महाराज
व तारा बाई हीं उभयतां अज्ञान होते, त्यांचे अज्ञान दशेचा फायदा परस्प
र्धी लोकांनीं घेऊन हें युद्ध उभें केलें, त्या लोकांनें पारपत्य कंपनी सरकारानें
केलें तें वाजवी आहे, पण, उभयतां मालकांचा या युद्धांत यत्किंचित् सं
बंध नसतां लढाईचे प्रायश्चित्ताबद्दल त्यांचा मुलुख कंपनी सरकारानें घेतला
हा न्याय जाहाला असें ह्मणतां येत नाहीं. कैलास वासी दौलत राव महा
राजांशीं अर्जनगांवचे मुक्कामीं कंपनी सरकारचा तहनामा होऊन, दौलत रा
वानें एकंदर राज्यांतील सुमारें दाहा आण्याचे किमतीचा मुलूख त्यानें कं
पनी सरकारास दिला. कंटिंजेंट फौज बाळगण्याचें जर दौलतराव महारा
ज कबूल करतील, तर, तिचा खर्च आह्मास मिळालेले मुलखांतून भागऊन,
निराळा मुलूख अगर खर्च मागणार नाहीं; असें कंपनी सरकारानें आपलें
मत त्या तहनाम्यांत प्रदर्शित केलें असून, त्या नवीन तहनाम्याचे वेळेस या
मतानें स्मरण देखील कंपनी सरकारचे अधिकाऱ्यास राहिलें नाहीं हें मो
ठें आश्चर्य आहे. शिंद्याचा पोंकळ दरबार असल्यामुळें कंपनी सरकारानें
हर एक प्रसंगीं तों कों परांनीं लुटला असें ह्मटल्या वांचून राहावत नाहीं.

नंतर सुमारें नऊ वर्षांनीं ह्मणजे सन, १८५२ इसवीचे सुमारास-

सन १८५७ इसवी. शके १७७९.

कंपनी सरकारानें जयाजीराव महाराजास राज कारभा
र स्वतः पाहाण्याची मुख त्यारी दिली. त्या पूर्वीं राजश्री
दिनकर राव राजवाडे यांस शिंदे सरकारची दिवाणगिरी प्राप्त जाहाली
होती. काडतुसाचे निमित्यावरून बंगाल इलाख्यांतील कंपनी सरकारचे-
नौकरींतील फाळी, पलटणें बिघडलीं, त्यांतील शिपायांनीं बंड केलें तें व
णव्या सारखें सर्व हिंदुस्थान भर पसरलें. बंडवाल्यानीं नाना साहेब पेश
व्यास आणि तात्याटोप्यास आपले अधिकारी करून त्याच्या टोळ्या
चोहींकडे हिंडु लागल्या, कंटिंजंट फौज मुऱ्हारचे छावणींत ग्वालेर सं

स्थानचे रक्षणा करितां कंपनी सरकारानें ठेविली होती,त्यांतील नेटीव शि पाई बंडांत मिळाले तेव्हां पोलिटिकल यजंट छावणी सोडून पळाला.

नंतर शिंद्याचे खासगी फौजेंत कांहीं बखेडा होऊन शिपाई लोक- बेमान होतील असा रंग दिसूं लागला, इतक्यांत तारिख १ जून रोजीं नाना साहेब पेशवे, तात्या टोपे, कांहीं बंडवाल्यास बरोबर ग्वालेरीवर हल्ला करावयास आले,ते समयीं शिंद्यांकडील फौजेची बंडवाल्याशीं लढाई जाहाली, त्यांत शिंद्यांचे फौजेचा पराभव होतांच, जयाजीराव महाराज व रा. दिनकरराव उभयतां इंग्रज सरकारचे आश्रयांस आग्र्यास पळून गेले. कंपनी सरकारचे नामांकित सेनापति सरह्यू रोस साहेब कांहीं फौज व महाराजास बरोबर घेऊन, ग्वालेरी कडे निघाले, हें वर्तमान बंडवाल्यास कळतांच ते ग्वालेरचें ठाणें सोडून तारिख २० जून रोजीं पळाले. सरह्यू रोस साहेबानें ग्वालेरींत जयाचा झेंडा उभारून पुन्हा महाराजास राज्यावर स्थापन केलें. बंडवाल्याचा ग्वालेरींत सुमारें वीस दिवस अंमल होता तितक्यांत त्यानीं शिंदे सरकारचे व इतर लोकांचें द्रव्य लुटून नेलें.

इ. सन १८५८ शके १७८०

बंड उत्पन्न जाहाल्या पासून तें मोडे पर्यंत बंडवाल्यानीं शिंदे सरकारचे मुलखांत अतिशय उपद्रव लाविला होता, तो सोसून महाराजानीं आपलें इमान कंपनी सरकाराशीं कायम ठेविलें होतें. तारिख १ नवंबर रोजीं कंपनी सरकारची हिंदुस्थानांतील राजसत्ता महाराणी विक्टोरियाचे हातीं जाऊन, तिचा अंमल चालू जाहाल्यावर कलकत्यांतील नामदार गवरनर जनरल लार्ड क्यानिंग साहेब नेटीव संस्थानिकांच्या भेटी घेण्या करितां प्रांतांत फिरावयास निघाले तारिख ३० नवंबर रोजीं त्याणीं आग्रामुक्कामीं मोठा दरबार करून, त्यांत पुष्कळ राजे लोकांच्या भेटी घेतल्या, व कितीं एकां विषयीं या दरबारांत भाषणें केलीं, त्यांत जयाजीराव महाराजा विषयीं भाषण केलें तें

इ. सन १८५९ शके १७८१

## ग्वालेरचे माहाराजयांस.

"आजचे दरबारांत आमचे सरदार मुत्सदी व सेनापति आले आहेत.

आह्मास फार आनंद झा

"ला आहे. आग्र्याचे डेफर्ट् नेट गवरनर काल्वीन साहेबास आपण बंडा
"प्रसंगीं मदत केलीन, हें वर्तमान आह्मास समजलें, तुमचें राज्य बंडवाल्या
"नीं ग्रासिलें तेसमयीं सरह्यू रोस साहेबानीं त्यांस तुमचे राज्यांतून पिटू
"ळून, विस दिवसांत तुह्मास पुन: राज्यावर स्थापिलें, बंडाच्या नाश करण्या
"करितां, तुह्मीं आह्मास हरयेक प्रकारें मदत करून आह्माशीं दोस्ती कायम
"ठेविलीन, हें जाणून आह्मी तुह्मास तीन लक्षाचा नविन मुलुख देण्याचा
"निश्चय केला आहे. कांहीं दिवसा पूर्वी ग्वाल्हेर मुक्कामी तह करून तुह्मीं आ
"ह्मास मुलुख दिला आहे, त्याची बेरीज तुह्मी जी काढून दिली होती तितकी
"उत्पन्न होत नाहीं, ह्मणून तोट्या बद्दल आपले कडे आमची बाकी मुळ
"निघत आहे, ती आपल्यास माफ करून असें आपल्यास कळवितों कीं, या
"बाकीबद्दल इतउत्तर या सरकारांतून आपले कडे मागणें होणार नाहीं. सर
"रहू तहनाम्यांत आपण अमुक फौज बाळगावी अशी यत्ता करविली आहे, तीप
"ना आपल्यास खुली केली आहे. आपल्यास औरस पुत्र न जाहल्यास दत्तक
"देऊन आपलें संस्थान चालविलें जाईल, आपले घराण्यांचा सदोदित उत्कर्ष
"होत असावा अशी राणी सरकारची इच्छा आहे, ही गोष्ट आपले स्थलेनें व आ
"पण दृढतेनें मनांत वागवावी. उभयतां सरकारांत जो स्नेह आहे तो कायम रा
"खून आपण राणी सरकाराशीं एकनिष्ठपणें वागावें, आणि आपले राज्यांत
"मुलकी, लष्करी बंदोबस्त चांगला ठेवून प्रजेचें पालन करावें. आपले राज्यां
"त आपण स्वस्तता आणि आबादी राखण्याचे कामांत दक्षता ठेवाल असा-
"आमचा मनोरथ आहे, तो आपले हातून सिद्धीस जाईल अशी आह्मास पू
र आशा आहे !!"

वरील भाषण संपल्यावर नंतर रा. दिनकर राव राजवाडे दिवाणया
जीं बंडाचे प्रसंगीं आपले दरबारची आणि कंपनी सरकारची सेवा एकनि
ष्ठ पणें केली, ह्मणून त्यांस ही पांच हजार रुपयांचे इनाम गांव देण्याचा आह्मीं
निश्चय केला आहे, असें नामदार गवरनर जनरल साहेबानीं या दिवाणाब
द्दल या दरबारांत भाषण केलें. रा. दिनकररावांची पूर्व कथा अशी आहे कीं,

दक्षिण कोंकणांत रत्नागिरी जिल्ह्यांत देवरुख नावाचें + एक खेडे गांव आहे, तेथें त्याचे तीर्थरूप राघोपंत राजवाडे मुळा पासून राहात होते. राघोपंत दिनकर रावास बरोबर घेऊन रोजगाराकरितां प्रथम ग्वाल्हेरीस गेले, ते समयीं दिनकररावाचें वय आठ वर्षांचें होतें. राघोपंत फार दिवस लहानशा रोजगारावर होता, दिनकर राव प्रौढ झाल्यावर त्यास प्रथम कारकुनीची जागा मिळाली. भाऊ पोतनीस दिवाणगिरीचे कामावर असतां, दिनकर रावाकडे मोठें जबाबदारीचें काम होतें. भाऊ पोतनिसा कडून दिवाण गिरी निघाल्यावर रा. दिनकरराव दिवाण जाहाले. नंतर एक वर्षानीं महाराज जयाजी रावास मुकत्यारी मिळाली. दिवाण गिरीचा अधिकार त्याचे हातीं सुमारे दाहा वर्षें होता, त्यांत दरबारांतील कामाचे पद्धतींत त्यानीं पुष्कळ फेरफार करून इंग्रजी रिवाज चालू केले.

जयाजी रावानीं आपले दौलती तून पन्नास हजारांची जाहागिरी दिनकर रावजीस दिली आहे, ती अद्याप चालत आहे. कलकत्ता येथील लेजिस्लेटिव्ह कौन्सलांत या दिवाणाची नेमणूक इंग्रज सरकारानें केली, तेव्हां सांप्रत कालचे राज्यरीती विषयीं एक लहानसें पुस्तक लिहून यानीं नामदार गव्हरनर जनरल यास दिलें होतें.

पुढें कांहीं दिवसानीं या महाराजांचा आणि दिवाणाचा बेबनाव होऊन त्यानीं आपलें काम* सोडलें. नंतर महाराजानीं त्याची जाहागीर जप्त केली होती, ती इंग्रज सरकारचे आग्रहास्तव त्यानीं पुनः सोडली. दिनकर रावजीनें शाहाणपणाचा लौकीक मराठी व इंग्रजी दरबारांत उत्तम प्रकारचा असून, महाराजांनें व त्याचें कोणते कारणा वरून वांकडें आलें तें कारण समजत नाहीं. ज्या मनुष्यानें स्वतंत्र कारभार फार दिवस केलेला असतो, त्यास थोडीं दिवस परतंत्रता प्राप्त जाहाली असतां सहन होत नाहीं. अज्ञान धनी असला म्हणजे कारभाऱ्याचे हातीं जशी पूर्ण सत्ता असते, ती धनी

---

+ हा गांव इंग्रज सरकारांतून आपण इनाम घेऊन दिनकर रावजीनीं ब्राह्मणास अग्रहार करून दिला आहे.

* पुढें बळवंतराव चिमणाजी दिवाण जाहाले. हाल्लीं गणपत राव खडके यांजकडे दिवाणगिरीचें काम आहे, ते जातीनें मराठे आहेत.

ज्या मनुष्याचे हातीं असतें, त्याचा पाडाव करावा ह्मणून त्याचे स्पर्धी लोक रात्रं दिवस राजाचे कान फुंकीत असतात. ज्या दिवाणास इंग्रज सरकारचे दरबारचा चांगला आश्रय मिळतो, तो धन्यास गुंडाळून ठेऊन आपले मर्जीमाफक काम करूं लागला ह्मणजे, त्याचा शिरजोरपणा धन्यास आवडत नाहींसा होतो. धनी प्रौढ जाहाल्यावर दिवाणानें आपली पहिली सत्ता चालविण्याचा अभिमान धरणे हा मोठा वेडेपणा आहे, कारण दिवाणगिरीचें काम कोणीही मनुष्यानें कसें हो चालविले नरी, ते त्याचे हातीं ठेवणें अगर काढणें हे धन्याचे मर्जीचें काम आहे. याकरितां जसजसा धनी सज्ञान होत जाईल, तसतसा दिवाणानें आपला अधिकार सोडित गेलें पाहिजे. नाना फडणीस मोठा शाहाणा होऊन गेला. पण सवाई माधवरावाचे अल्पवयांत जी त्यास वागविण्याची पद्धत त्यानें घातली होती, तीच माधवराव सज्ञान झाल्यावर नानानें ढिलाई दिली नाहीं, यामुळें सवाई माधवराव पेशवा प्राणास मुकला. आपले हातांतील अधिकाराची लगाम प्रसंगानुरूप सैल सोडणें, अथवा आंवरून धरणें हें काम प्रत्येक कारभाऱ्यानें अगर दिवाणानें जपून केलें असतां, धन्याचें आणि चाकराचें जें परिणामीं वितुष्ट वाढतें तें वाढणार नाहीं. रा. दिनकर रावजीजरी शिंद्याची दिवाणगिरी सोडून घरीं स्नानसंध्या करित आहेत, तथापि दक्षणेतील सरदारांचे पटांत पहिले प्रतींत त्याचें नांव दाखल करून, राव राजे असें पद त्याचे नावास राणी सरकारानें जोडलें आहे ते अद्याप चालू आहे.

सन १८५७ इसवीचे बंडानें सर्व हिंदुस्थानांतील गरीब रयतेवरच

इ. सन १८६० } शके १७८२. } तीन पुष्कळ कर बसून रयत फार त्रासली आहे, तथापि या बंडा पासून नेटिव संस्थानास अनेक प्रकारचे लाभ जाहले आपले कंपनी सरकारानें बंड होण्या पूर्वीं वोकेसन्यास घेऊन सर्व संस्थानांची आपले पुढीस योजना केली होती, ती बेत रहित होऊन सर्व संस्थानास दत्तकाची परवानगी मिळाली. नेटिव संस्थानास झाडाच्या पाल्या प्रमाणे समजून त्यांचा तिरस्कार सरकारचे मनांत उत्पन्न जाहा

त्या होता, ती नाहींसा होऊन सर्वांचे पूर्वापार मान होते ते कायम राखून कित्येकास नवीन मानमरातब प्राप्त जाहाले. या बंडानें शिंदे सरकारचे राज्यास किती फायदा त्याचा तपशील.

१ सर्वांबरोबर दत्तकाची परवानगी मिळून तीन लक्षाचा नवा मुलूख मिळाला.

२ सन १८४४ चे तहनाम्यावरून तीन हजार पायदळ आणि बत्तीस तोफा बाळगाव्या असा निरबंध जाहाला होता, तो रद्द होऊन पांच हजार पायदळ आणि ३६ तोफा ठेवण्याची परवानगी मिळाली.

३ कंटिंजंट फोजेस १८ लक्षाचा मुलुख सन १८४४ सालीं कंपनी सरकारास नेमून दिला होता, त्याचे वसुलांत तोटा दरसाल येत होता तो भरून द्यावा, ह्मणून इंग्रज सरकारचा तगादा होता तो मना जाहला.

४ दक्षिणेंत शिंदे सरकारचे खासगी कडील कांहीं इनामी व वतनी गांव चालत होते, ते सन १८६१ इसवी सालीं इंग्रज सरकारास देऊन त्याचे बदला मुलुख हिंदुस्थानांत आपले राज्यानजीक शिंदे सरकारानें घेतला. शिंदे सरकारचा मुलुख बदल्यांत इंग्रज सरकाराकडे आला त्याची बेरीज ७३०५३५८५८५ रुपये इतकी असून, इंग्रजानीं ७१५९५२८१८१ रुपयांचा मुलूख दिला. तोट्याची रक्कम दरसाल इंग्रज सरकारांतून शिंदे सरकारास नक्त पावते.

बायजा बाईकडे इंग्रज सरकारांतून चार लक्ष आणि शिंदे सरकारांतून दोन लक्ष एकूण साहा लक्षाची नेमणूक चालत होती. ही बाई रद्द होऊन ग्वालेरीस तारिख १५ जुलईस मरण पावली.* (इ. सन १८६४. शके १७८६.) तिचे उत्तर कार्यार्थ हिंदुस्थानातील सर्व क्षेत्राचे वगैरे ठिकाणी एक लक्ष ब्राह्मण भोजन या महाराजानीं घातलें. पुढें ह्यांची वृत्ती एकाएकीं परमार्थ साधनाकडे वळून त्यांणी प्रसिद्ध गोविंदबावा नाशिककरास आपला गुरु केला. ब्रह्मावर्त, काशी, या क्षेत्रांत निरंतर चालण्यासारखीं कांहीं धर्मकृत्यें या महाराजानीं करून ठेविलीं आहेत. आपल्या

* आषाढ शुद्ध ११ शके १७८६, संवत १९२१

इ. सन १८६५. शके १७८७ } क मुलगा तारिख २५ नवंबर रोजीं दत्तक घेतला त्याचें नाव राणोजीराव ठेविलें. राणोजीराव ह्यांनीं विद्याभ्यासा करितां पुण्यांत येऊन राहिले आहेत.

ग्वालेर मुक्कामी प्रति वर्षी श्रावण मासीं गोकुळ अष्टमीचा मोठा उत्साह होतो, ते समयीं ब्राह्मण भोजने वगैरे धर्मादाय होत असतो. भगवत् भजन, साधूचें दर्शन, तीर्थ यात्रा, फौजेची कवाईत, या विषयांवर जितका महाराजांचा भर आहे तितका दुसरे विषयांवर नाहीं. सन १८५७ इसवीचे सालचे बंडांत यांचें इमान इंग्रज सरकाराशीं कायम राहिलें, म्हणून विलायतेहून महाराणी विकतोरिया इणे यास पहिले प्रतीचा बांद देऊन याचा मान वाढविला आहे. विद्यमान काळीं जे रजवाडे लोक हिंदुस्थानांत शेष राहिले आहेत, त्यांत जयाजीराव महाराज हे राजनीतींत दक्ष आणि सूज्ञ आहेत, म्हणोन राणी सरकारचे दरबारांत याचा पहिले प्रतीचा लौकीक आहे, तो उत्तरोत्तर वृद्धिंगत होऊन शिंदे सरकारचे राज्य ईश्वरानें निरंतर कायम राखावें अशी माझी ईश्वरास प्रार्थना आहे.

इतिहास समाप्त.

---

## किरकोळ माहिती.

सन १८५२ इसवी साली जार्ज क्यांबेल यानी हिंदुस्थान देशाचा इतिहास लिहिला आहे. त्यांत शिंद्याचे मुलखा विषयीं वर्णन लिहिलें आहे तें

३३११९ शिंदे याचे मुलखाचे चौरस मैल क्षेत्र फळ.

३२२८५१२ मुलखांतील वस्ती.

८०००००० दर साल वसूल येतो ती रकम रुपये.

० दरसाल कंपनी सरकारास शिंदे सरकारा कडून कांहीं पावत नाहीं.

इंग्रज सरकारची फौज शिंदे सरकारचे संरक्षणा करितां आहे ती.

४ तोफखान्या कडील कंपन्या चार.

२ घोडे स्वारांच्या रिजमिटी दोन.

७ पायदळ रिजमिटी सात.

---

एकूण मनुष्यें ८४०१ इंग्रजा कडील शिंदे सरकारचे मुलखांत आहेत.

ग्वालेर संस्थानाचा सांभाळ इंग्रज सरकारानीं करावा व शिंद्यानीं इंग्रजसरकारची फौज वर लिहिले प्रमाणें आपले मुलखांत बाळगावी. माहे ज्यानेवारी सन १८५३ इसवी पर्यंत संस्थानचा कारभार इंग्रज सरकारचे हातल्यानें चालावा पुढें इंग्रज सरकारानीं दखलगिरी करूंनये.

---

महाराजास इंग्रजसरकारांतून १९ तोफांची सलामी मिळते, नाइट ऑफ् धीस्टार ऑफ् इंडिया असा नवीन किताब विलायतेहून महाराजांस मिळाला आहे.

---

## महाराज महादजी शिंदे यांस कंपनी सरकारांतून मिळालेलें यजितपत्र.+

मौजे वडगांव नजीक दाभाड्याचे तळेगांव येथें इंग्रजी सैन्याचा मोड जाहाला तेव्हां इंग्रजाचे युद्धाचे कमेटीतील जान कर्न्याक व करनल हरिंगटन यादोन साहेबांनी महाराज महादजी शिंदे यास तारिख १६ ज्यानेवारी सन १७७९ इसवी रोजीं यजितपत्र लिहून दिलें तें.

सरकार माधवराव नारायण पंडित प्रधान यांशी आमचें वैमनस्य पडून त्यांशीं लढाई करण्यास आह्मीं तळेगांवीं आलों. तुमची आमची लढाई

+ मुंबई सरकारचे आज्ञे वरून सर्व तहनामे एकत्र करून एक पुस्तक छापलें आहे त्यांतून त्या पत्राचा तरजुमा करून घेतला आहे.

जाहाली, त्यांत आमचा मोड होऊन आह्मीं वडगावास रघुनाथराव पेश
वे यांचे छावणींत जाऊन मिळालों. आमचें सामान व फौज घेऊन परा
मुंबईस जाण्यास आह्मास सामर्थ्य राहिलें नाहीं, याजकरितां तुह्मीं मध्य
स्त होऊन पेशवे सरकाराशीं आमचा पूर्ववत प्रमाणें दोस्तीचा तह करून
द्यावात, आणि आह्मास आमचे फौजे सह मुंबईत पोहचऊन द्यावें, या मस
लतीस आमचे तर्फे मिस्तर पारमर व होम साहेब याउभयतांस तुह्माकडे
पाठविले होते. नंतर तुह्मी लढाई बंदकरून पेशवे सरकाराशीं आमचा त
ह करून दिलात, आणि आमचे फौजेस मार्गांत कांहीं एक उपद्रव न हो
देतां मुंबईस पोहोचविण्याचें आपण कबूल केल्या मुळें, आमची या प्रसं
गांतून सुटका जाहाली. हे सर्व तुमचे उपकार स्मरून आह्मास फार सं
तोष जाहाला आहे. तुह्मी मराठे सरदारांत मुख्य सरदार असून, कंपनी
सरकारचे हितेच्छु, ह्मणून तुह्माशीं दोस्ती असावी असें कंपनी सरकार
दिलांत वागलें आहे. पेशव्यांचे उपद्रवा पासून आपण आमची सुटका के
लीत, आणि त्यांचा आमचा कांहीं लढा ठेविला नाहींत, तरी आमचे हातून आ
पली कांहीं सेवा घडावी ह्मणून, आह्मीं स्वसंतोषानें भडोच तालुका कि
ल्ला आमचे ताब्यांत आहे तो तुह्मास देण्याचा कबूल केला आहे, आह्मी
मुंबईत पोहोचल्यावर मुंबईचे गवरनर साहेबाचे मार्फत विलायतचे बा
शाहाचे सही शिक्क्यानिशीं सनद भडोच येथील अमलदाराचे नावें ताल
का तुह्मास देण्या विशीं आणून देऊं. हा तालुका ज्याप्रमाणें मोंगलाचे ता
ब्यांत होता, त्या प्रमाणें तुमचे ताब्यांत देऊं. या करारांत आह्माकडून अंत
होणार नाहीं. याकबुलायती प्रमाणें आमचे हातून उलगडा होई पर्यंत, मि
स्तर पारमर व स्टवर्ड या उभयतांस तुह्मा पाशीं ओलिस ठेविले आहेत
तर या करारांत किमपि कमज्यास्त होणार नाहीं हा करार आह्मीं लिहून
दिला असे मुक्काम वडगांव नजीक तळेगांव तारिख सदर

हे पत्र कलकत्ता सरकारानें मंजूर केलें नाहीं, ह्मणून या पत्रा सं
बंधीं एक थोरा तहनाम्याचे पुस्तक रचणारानें लिहिला आहे, परंतु या प
त्रांत लिहिल्या सर्व गोष्टी अमलांत आल्यावर, मग कलकत्ता सरकारानें
हें पत्र कबूल केलें नाहीं ह्मणून झालें काय? माझें मत.

## महाराज महादजी शिंदे यांचे समजुतीबद्दल सवाई माधवरावपेशवे यांचे पत्र.*

राजश्री महादजी शिंदे गोसावीयांस सकळ गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य.

स्नेहें कित माधवराव नारायण प्रधान आशिर्वाद विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय कुशल लिहीत जावें विशेष. तुह्मीं चंद्र १ सफरचें पत्र पाठविलें तें पावलें, हिंदुस्थान चा बंदोबस्त आह्मां कडे आहे. आली बाहादुर आमचे निसबतीस पाठविले असतां, त्याची रवानगी बुंदेलखंडांत करणार; तेव्हां बुंदेलखंड मात्र जागासरकारची बरकड जागा कोणाची? त्यास आली बाहादुर बुंदेलखंडांत जाऊन तिकडे बंदोबस्त करतील. आह्मीं उभयतांसरदार फौजे सह्वां येतों ह्मणून लिहिलें तें कळलें. ऐशियास थोरले कैलासवासीराव यांचा व बुंदले यांचा भाऊ पणा तें संस्थान केवळ सरकार निसबतीसच आहे. पूर्वीमल्हारराव बाबा, जयापा यांनीं फौज घेऊन जाऊन बुंदेले यांस तंबी पोहोंचवून मातब्बर खंडणी केली, तिजाई मुलुख सरकारांत घेतला, त्यास तिजाई मुलुखा पैकीं एका खेड्याची आशा न धरितां, व खंडणी पैकीं एका पैशाचा लोभ न करितां, दरोबस्त खंडणीचा ऐवज सरकारांत पाठविला व मुलुख सरकारचे मामलेदार यांचे हवालीं केला. हें वर्तमान जगविख्यात सर्वांस ठाऊक आहे, व तुमचे ऐकण्यांत आलें च असेल.

या प्रमाणें आज पर्यंत शिरशिरस्ता चालत आला आहे, त्याची वांटणी कोणास दिली नाहीं, फक्त सरकार निसबतीचें संस्थान हें समजून मल्हारराव बाबा, जयापा यानीं काडीमात्र अपेक्षा केली नाहीं, तुह्मांस समजल्यावर तुह्मी ही करणार नाहीं, असें आह्मास वाटतें. उज्जन, खाचरोध, हे माहाल तुमचे सरंजामाचे, तेथें गिराशेव मवास, यांनीं धामधूम केली असतां खंडेराव हरि यांनीं त्याचें पारिपत्य

* टीप १०९ पृष्ठावर.

केलें, तेथील उत्पन्नाचे ते धनी नव्हत; सरकारचें काम केलें इतकें त्याजकडे. तसेंच पूर्वी सरदारानीं सरकार काम केलें, परंतु पैशास लिप्ताळे झालें नाहींत, त्यांस मागील वहिवाट ठाऊक होती, त्यामुळें त्यांनी केलें तें ठीकच केलें. त्यांचे करण्यास कोणी दोष लावावा, अशी त्यानी वर्तणूकच केली नाहीं. तुह्मास समजल्यावर तुह्मी हीं करणार नाहीं. तुमचा आग्रह नाहीं असें आह्मास वाटतें. वरकड बुंदेलखंडाच्या बंदोबस्तास रामचंद्र हरी व हरी विठ्ठल हे सरकारांतून तीन-तीन चार चार हजार फौज घेऊन हुजरून जात, तिकडील बंदोबस्तच करीत, या अन्वयें चिरंजीव आली बाहादूर याची रवानगी करावी ह्मणून लिहिलें, त्यास चालत असतां कडेवर घ्यावें असें काय आहे हिंदुस्थानचा बंदोबस्त आह्माकडे आहे म्हणून लिहिलें, त्यास, हिंदुस्थानच सें काय? सर्व दौलतीचा बंदोबस्त तुम्हाकडे नाहीं कशावरून, दक्षिणेंत पेच पडला तरी तुम्ही काम करूं नये की काय? मोंगलाचा आमचा बिघड झाला तेसमयीं कैलासवासी विश्वासराव यास दत्तबायानी बरोबर घेऊन जाऊन, मातबर लढाई मारिली, पंन्नास लाखांचा मुलूख सरकारांत घेतला. तसाच कोल्हापूरचा पेंच पडला तेव्हां तुह्मास च नीट करावें लागलें. गुजराथचा बंदोबस्त तुमचेच हातून झाला. सर्व दौलतीचा अखत्यार तुह्मांवर असतां, किरकोळ कामा साठीं आणि वाजबी असतां मन उदास करावें, ही गोष्ट उचित नाहीं. वरकड मुलूख, मोठमोठीं संस्थानें, राजे रजवाडे, मवाड, कुढाड, घमरवाड, जाट, अकजाड, अंतरवेद, मीरठ, लोहीरखंड, लाहोर मुलूख पसरला आहे. तुमचा घोडा चालेल, तेथ पर्यंत मुलुख आपला नव्हे की काय? इतक्याचा बंदोबस्त करीत ह्मटल्यास अहंता अंगीं धरून गेलें असतां, वर्ष दोन वर्षें लागतील. एवढें काम एकीकडे ठवून बुंदेलखंडावरच मसलत पडली आहे, ही गोष्ट उचित नाहीं. अवघड मनसबा पडला आहे, बुद्धि कुंठित झाली आहे, या प्रकर्णी बुद्धि चालवून फाड करणारे महात्मे तुमचे बुद्धीचे असतां, किरकोळ कामा साठीं मन असट केलें, हें तुमचे समजास कसें ठीक पडलें, असें कसें ह्मणावें, विवेक सिंधुचा पा

णार तो कुबुद्धि कुपी बुडाला, ही गोष्ट कशी घडेल. आकाशाचें मान तुह्मीं बांधणार, तेथें क्लिष्ट कल्पना येतात हें आश्चर्य वाटतें. उभयतां सरदार एकत्र झाले असतां, अस्मान ही कडाडेल, तथापि कोणे गोष्टीचा अंदेशा धरावा असा अर्थ नाहीं, तिकडून इकडून गंगा प्रवाह चालला आहे, असें झाल्यास इहलोक परलोक उत्तम आणि धनीपणाची व सेवकपणाची कीर्ति दिगांतांत मावणार नाहीं. एक संकल्प-विकल्प सोडिल्यानें अनायासें अशीं महत् फळें प्राप्त होतात, त्याच गोष्टीस अनुसरावें असें आमचे मनांत आहे तसेंच तुमचे मनांत असल्यास कालिमा कोठेंही नाहीं; पहाता मुळी दोन्ही कडून शुद्धताच आहे. ऐकण्या सांगण्यामुळें फेर पडतो याचा विचार न करी तर, उपाय नाहीं, नाहींतर सर्व गोष्टी विचारांतच आहेत. तिकडील बंदोबस्त तुह्मी करीत आहां आणि कराल, हें जाणून बाहादूर यांची बुंदेलखंडांत पाठवावयाची योजना केली इतकाच अर्थ. दुसरा विचार कांहीं एक नाहीं; तपशिलें समजलें पाहिजे, यास्तव तुह्मास लिहिलें असे, दुसरा विचार-कांही एक नाहीं. रवाना चंद्र २७ सफर बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे-विनंती.

---

या पत्राची नकल गणेश कृष्ण उर्फ रावजी पेंडसे यांजपाशीं होती त्या वरून ही नकल केली असे. या पत्रावर साल नाहीं परंतु मशार निल्हे पेंडसे हें पत्र सन इसवी १७८९ सालीं लिहिलें असावें असें सांगतात.

## समाप्त.

# कंपनी सरकार व शिंदे सरकार यांचे दरम्यान अ* वल पासून एकंदर तहनामे जाहले त्यांचा तपशील.

## नंबर १.

महाराज सुभेदार माधवराव शिंदे बाहादूर व मेहेरबान करनल म्युरसाहेब या उभयतांत तहनामा जाहाला तो.

१ उभयतांचे मनांतून स्वस्थता होऊन दोस्ती राहावी ह्मणून उभयतांही आपले करार निरंतर कायम राखतील.

२ हा तहनामा ज्या तारखेस मंजूर होईल, त्या दिवसा पासून आठ दिवसांत उभयतांच्या फौजा जिकडील तिकडे एकसमयास चालत्या व्हाव्या. महाराजानीं आपली फौज घेऊन आपले मुलखांत जावें, आणि करनलम्यूर आपली फौज घेऊन नबाब वजीर उलमुलक तास्लिक याचे मुलुखांत जातील.

३ हैदर अल्ली खान, व पेशवे, या उभयतांशीं कंपनी सरकारचे तहनामे करून देण्याचे कामांत महाराजानीं इलाज करावा, तहनामे जाहाल्यास उत्तम, नाहीं पेक्षां कंपनी सरकार उभयतांशीं हवें तसें वर्तेल. पेशवे व हैदर खान या उभयतांतून एकास मदत किंवा एका विरुद्ध, महाराजानीं वर्तूं नये.

४ यमुना नदीच्या या बाजूचा महाराजांचा जो मुलुख कंपनीसरकारानें घेतला असेल, तो करनलम्यूर साहेब महाराजांस परत देतील. ग्वालेरचा किल्ला राण्यानें इंग्रज सरकाराशीं तह केल्या मुळें सदरहू किल्ला त्याचे ताब्यांत आहे, त्यास महाराजांकडून उपद्रव लागणार नाहीं. महिपत राम शिंग, व जगंदर बाहादर, यांचा मुलुख राण्याचे ताब्यांत आहे त्यासही महाराजांकडून उपद्रव लागणार नाहीं. गोरखीनदार, चत्रशिंगरा

* [illegible]स्थान सरकारानें सर्व तहनाम्याचें एक इंग्रजी पुस्तक छापलें आहे त्यावरून हें भाषांतर केलें

णा, बाहादुर दिलेर जंग, यांस व याचे मुलुखास महाराजा कडून उपद्रव अगर तोशीस लागणार नाहीं.

५ राजा रामचंद्र राजे चंदरी, याविरुद्ध राजेश्वर दिवाण याणें बंड करून त्याचें राज्य घेतलें आहे. त्या दिवाणास पदच्युत करून राजास पुनः राज्यावर स्थापन करण्याचें महाराज कबूल करीत आहेत. या राजाचा जो मुलूख पेशव्यांचे ताब्यांत फार दिवसा पासून असेल, तो परत देण्या विषयीं महाराज माधवराव शिंदे यांज कडून मदत होणार नाहीं.

सदरहू तहनामा तारिख १३ माहे अकूटंबर सन १७८१ रोजीं मंजूर जाहाला असे

---

## नंबर २रा

भडोच प्रगणा किल्ल्या सुद्धां कंपनी सरकारानें महाराज सूभेदार माधवराव शिंदे यांस दिला त्याची सनद तारिख ६ जून सन १७८२.

भडोच प्रगणा भडोचचे किल्ल्या सुद्धां मोंगला कडून फार दिवस कंपनी सरकारचे कबज्यांत आहे. तारिख १ मार्च सन १७७६ इसवी रोजीं पुरंदर किल्ल्यावर जो कंपनीसरकारचा व पेशव्याचा तह जाहाला त्यांतील चौथे कलमात पेशव्यानीं भडोच प्रगण्यातील व किल्ल्यांतील आपला अंमल कंपनी सरकारास दिला आहे. तारिख १७ मे सन १७८२ रोजीं कंपनी सरकारचा व महाराज महादजी शिंदे याचा सालपे मुक्कामीं जो तहनामा जाहाला, त्यांत पुरंदरचा तहनामा मंजूर केला आहे. वडगांव मुक्कामचे लढाईंत महाराज सूभेदार माधवराव शिंदे याणी कंपनीसरकारचा सांभाळ करून, त्याचे ताब्यांत इंग्रज लोक ओलिस होते त्यांचें आदर आतिथ्य महाराजानीं चांगलें रे विलें होतें, ह्मणून आह्मी स्वसंतोषानें भडोच प्रगण्याचा व किल्ल्याचा स्वराज्य, व मोंगलाई, एकूण दुतर्फा अंमल महाराज सूभेदार माधवराव शिंदे यास दिला आहे. तर सदरहू प्रगण्याचा दरोबस्त दुतर्फा अंमल जसा कंपनी सरकारा कडे चालत होता, त्याप्रमाणें महाराजा कडे चालेल तारिख सदर.

सई वारन हेस्तींग.
" व्हिलेर साहेब.
" म्याक फरसन.

## नंबर ३.

भडोच प्रगण्यांत व शहरांत इंग्लिशलोकांनीं व्यापार करावा ह्म-
णून महाराज सुभेदार माधवराव शिंदे याजकडून सनद.

नामदार गवरनर जनरल साहेबानीं कंपनी सरकारचे वतीनें, भडो
च प्रगण्याचा दुतर्फा अंमल आह्मास दिल्यावरून, सदरहू प्रगणा आम-
चे ताब्यांत आला आहे. सदरहू प्रगण्यांत इंग्लिश लोकांनीं व्यापार क-
रीत जावा त्यास कोणतेही प्रकारें आह्मा कडून तोशीस लागणार नाहीं.
इंग्लिश लोकांशिवाय दुसरे युरोपियन लोकांस सदरहू प्रगण्यांत व्या-
पार करण्याची परवानगी आह्मी देणार नाहीं. तारिख २१ मार्च सन
१७८३ इसवी.

## नंबर ४.

भडोच प्रगण्यांत इंग्लिश लोकांचे व्यापारास जकात घेण्या
विषयीं तह तारिख २० माहे सप्टंबर सन १७८५

कंपनी सरकारानें भडोच प्रगणा महाराज सुभेदार माधवरा
व शिंदे यास दिला, त्यांत इंग्रज लोकांनीं व्यापार करावा ह्मणून महारा
ज माधवराव शिंदे याणीं कंपनी सरकारास तारिख २१ मार्च सन १७८३
इसवीची सनद दिली आहे, परंतु त्यांत जकातीचें कलम मोघम राहि-
लें आहे, त्याचा निकाल स्पष्ट रीतीनें करावा ह्मणून महाराज सुभेदार
माधवराव शिंदे व कंपनी सरकार याउभयतांचे मनांत आल्यावरून हा
तहनामा करण्यांत आला आहे तो.

### कलम १.

भडोच येथील नबाबाशीं सन १७६४ इसवी सालांत कंपनीस
रकारचा तह जाहाला आहे त्यांत इंग्रज लोकांपासून जकात घेण्याचा-

ठर केला आहे, याप्रमाणें कंपनी सरकारचे दर वर्षाचे व्यापारा- वर महाराज सुभेदार माधवराव शिंदे जकात घेण्याचें कबूल करीत आ हेत त्याचा तपशील. भडोच्या मध्यें सुरती वजनानें एक खंडी कापूस खरेदी केला असतां, त्यास दिड रुपया, आणि च्यारपिलुस जकात कंपनी पासून घ्यावी. कापसा खेरीज जर कंपनी दुसरा माल बाहेरून भडो- च्यांत विकण्यास आणील, किंवा भडोच्यांत खरेदी करून बाहेर विकण्या स नेईल, तर दर शेंकडा दिड रुपया जकात कंपनी पासून घेण्यांत येई- ल. सदरील पदार्थां शिवाय जर कोणी इंग्लिश लोक दुसरे प्रकारचा- माल आणतील तर, त्यांस शेंकडा साडा रुपये जकात घेण्यांत येईल. महाराज माधवराव शिंदे असा हुकूम करतात कीं, कंपनीनें आपले- व्यापारांत कोणी हिंदुस्थानी लोकास भागीदार करूं नये. जर असे हिं दुस्थानी लोक भागीदार होतील तर, मग यागोठीं चालणारे व्यापारी लोका पासून जी जकात शिंदे सरकार घेईल, त्या प्रमाणें कंपनी पासू- न जकात घेण्यांत येईल. कंपनीचे व्यापारावर जी जकात सदरी लिहि ले प्रमाणें घेण्याची असेल, ती कंपनी कडील जो रसिदेन्ट भडोच्यांत आहे, तो शिंद्याचे अंमलदारास जकातीची रक्कम देत जाईल.

कलम २.

भडोच शहराचे आसमंतात् भागीं जीं बंदरें आहेत, त्यांत एखादें खिस्तनी तारूं, मचवा, अथवा होडगें, फुटून त्यांतील माल बंदरांत पडे ल तर, बंदराचे मालकानें तो माल घ्यावा अशी फार दिवसा पासून वहि वाट चालत आहे, परंतु कंपनी सरकारची व महाराज सुभेदार माधव राव शिंदे यांची दोस्ती असल्या मुळें, नामदार गवरनर जनरल यांणीं महाराज सुभेदार माधवराव यांस अशी विनंती केली कीं, नरमदा न दी भडोच प्रांतांत आहे, त्या नदींत इंग्लिश लोकांचें एखादें तारूं, म चवा, अथवा होडगें, फुटून जो माल सांपडेल तो इंग्लिश लोकांस परत देत जावा, माधवराव सुभेदार कंपनीचे दोस्ती खातर असें कबूल क रितात कीं, नरमदा नदींत जो माल इंग्रज लोकांचें जाहाज वगैरे फुटून अंमलदाराचे हातीं लागेल, आणि त्यावर इंग्रजी खूण असेल तर, अ-

से प्रकारचा माल अंमलदारानें कंपनी सरकारचे रसिदेंटाचे हवाली करा वा. हा माल काढण्या प्रीत्यर्थ अंमलदारास जो खर्च आहाला असेल तो रसिदेन्ट साहेब देतील.

## कलम ३.

भडोचचे किल्ल्यांत जाण्या येण्याचे बाबदीत महाराजाचे रयतेचे आणि इंग्रज लोकांचे कांहीं तंटे उत्पन्न जाहाले आहेत, त्या बाबत महाराज माधवराव फडनेदार असा ठराव करितात कीं, जेव्हां किल्याचा दरवाजा चाली प्रमाणें उघडा असेल, ते वेळेस इंग्रज लोकास व त्याचे अनुयाई लोकांस किल्यांत जाण्यास, व किल्यांतून बाहेर येण्यास, भडोच येथील अमलदारानें लोकांनीं प्रतिबंध करूं नये. नेमिले वेळेस किल्याचे दरवाजे लागल्यावर, कोणी इंग्रज अथवा त्याचे पदरचा मनुष्य किल्यांतून बाहेर जाईल, किंवा किल्यांत जाऊं लागेल तर, त्यास जाऊं येऊं देऊं नये. दरवाजे बंद जाहल्यावर इंग्रज लोकांनीं दरवाजा उघडण्यास सांगूं नये अथवा एखादें तारूं रात्रीस बंदरांत येईल तर, ही खबर इंग्रज लोकांनीं रात्रीस सांगण्यास येऊं नये.

## कलम ४.

इंग्लिश लोकांचे खासगी नोकर लोक, इंग्रज व्यापारी, अथवा इंग्लिश लोकांचे कारखान्यांत काम करणारे सुतार, लोहार, हमाल, जे लोक इंग्रजी कारखान्या खेरीज दुसरे ठिकाणी काम करीत नसतील, तर सदरील सर्व लोक भडोच येथील रसिदेन्टाचे ताब्यांत आहेत, असें समजून या लोकांस जकाती वगैरे तोशीस अंमलदारानें लाऊं नये. या लोकांचे हातून कांहीं अपराध होईल तर, त्या मनुष्यास अंमलदारानें धरून रसिदेंटाकडे पाठवावे, ते चौकशी करून योग्य शिक्षा देतील, अथवा त्या मनुष्यास रसिदेन्ट साहेब अंमलदाराकडे चौकशी होण्या करितां परत पाठवितील, इंग्रजी कारखान्यांत काम करणारा कोणी कारागीर असून, तो शहरांतील दुसरे लोकाकडे काम करील तर तो मनुष्य इंग्रजी कारखान्यांत काम करणारा नाहीं, असें समजून अमलदारानें त्या पासून चाली प्रमाणें जकात, अथवा कर, घेणे असेल तो घ्यावा.

या बाबनींत कांहीं तंटा पडूनये, ह्मणून रसिदेन्ट साहेबानें कारखा-न्यातील लोकांची तपशील वार याद तयार करून अंमलदाराचेस्वा-धीन करावी.

## कलम ५.

शहरांतील कोणी मनुष्य अंमलदाराचे भयानें पळून रसिदेन्ट साहेबाचे आश्रयास येऊन राहीलतर, त्या मनुष्यास रसिदेन्यानें अंम-लदाराचे स्वाधीन करावा.

## कलम ६.

भडोच येथें इंग्लिश कारखान्याचे, व त्यांतील मालाचे रक्षणाक रितां, पन्नास शिपाई रसिदेन्टानें ठेवावे, ज्यास्त शिपाई ठेऊं नये. कंपनी-चे मुलखांत जसा कंपनीचा तंबूर वाजतो, तसा कारखान्यांत त्याचा तंबू र वाजूं नये. रसिदेन्ट साहेबाचे दिमतीस अगर त्याचे स्वारीस जी मनुष्यें नेमिलीं असतील, त्याणीं पटे घालीत जावें बंदुका घेऊं नये.

## कलम ७.

भडोच येथील लोक कंपनीचे रयतेचें देणेदार असतील, किंवा पु-ढें कोणी देणेदार होतील आणि तें कर्ज व्याज कडून न फिटेतर त्या संबंधा-ची अमलदारानें आपले अदालतीचे कचेरींत चौकशी करून, देणें वाज-वी असलेतर तें देवविण्याची तजवीज करावी. ज्यावेळेस भडोच प्रगणा कंपनी सरकारानें महाराज सुभेदार माधवराव शिंदे यांस दिला, त्यावेळे स भडोच्यांतील लोकांनीं जें कंपनीचे रयतेचें देणें होतें, त्या कर्जाची चौकशी अंमल दारानें करून कर्जदार चांगले स्थितींत असलेतर, तात्काळ त्या कर्-जांची फेड करवावी. जर कर्जदारास देण्याची ऐपत नसेल तर, हासेबंदीनें-फेड करावी, असा ठराव करून तो अमलांत आणण्याची तजवीज अम लदारानें करावी.

सदरहू तहनामा करणारे उभय पक्षाकडील लोक आप आपले-धर्मा प्रमाणें अशी प्रतिज्ञा करितात कीं, त्या तहनाम्या प्रमाणें आह्मीं-वर्तुं.

जाम्याक फारसन.




१ आरस्लोपर.
१ जानस्टेबपलस.
१ चारलसस्टुवर्ट.

महाराज सुभेदार माधवराव-
शिंदे यांची मखलाशी व शिक्का.

---

## नंबर ५.

---

सदरील तहनाम्याचें पुरवणी कलम तारिख ९ जानेवा-
री सन १७८९ रोजीं ठरले ते.

भडोच प्रगण्यांत जो इंग्लिशलोक मालखरेदी करतील, त्यावर भ-
डोचचे नबाबाचे कारकीर्दीत जीजकात घेण्याची पद्धत होती, तीस अनु-
सरून महाराज सुभेदार माधवराव शिंदे व कंपनी सरकार यानीं जका-
ती बद्दल तहनामा ठरविला आहे. ते वेळेस कंपनी सरकारचा प्रतिवर्षी
किती व्यापार होतो, याचा अजमास कंपनीस व महाराजास समजला
नवता, हा वार्षीक अजमास समजावा असी महाराज सुभेदार माधव
राव यांणीं इच्छा प्रदर्शीत केल्यावरून, नामदार गवरनर जनरल यां-
णीं मुंबईचे गवरनरास लिहून, भडोच येथील कंपनीचे वार्षिक व्यापा
राचा अजमास आणिला, त्यावरून आठशें खंडी कापूस, व इतर जि-
नस दिड लक्षाचा, या प्रमाणें कंपनीचे व्यापाराची दरसाल भडोचांत प
डामोड होते. उभयतां समतीनें असा ठराव करण्यांत येतो कीं, दर
खंडीस १॥ ४ दिड रुपया, चार पिलुस, व इतर मालास दर शेकडा दिड
रुपया प्रमाणें दिड लक्षाची जकात, व कापसाची आठशें खंडीची ज
कात एकूण दोन्ही जकातीची बेरीज, रसिदेन्ट साहेब कंपनी सरकार-
चे वतीनें महाराजाचे अंमलदारास देतील, जर सदरील अजमास
पेक्षां वर्षांत ज्यास्त माल खरेदी किंवा विकण्यांत येईल तर, जकातीत
ज्यास्त माला बद्दल अलाहिदा पैसा रसिदेंट साहेबा कडून आदा हो
त जाईल.

---

## नंबर ६.

तारिख ३० माहे दिजंबर सन १८०३ इसवी मुक्काम सरजे अजनगांव ऊर्फ अजंटा येथें तहनामा जाहाला तो.

### कलम १.

कंपनी सरकार व त्यांचे दोस्त व महाराज दौलतराव शिंदे अलिजा बाहादर यांन निरंतर दोस्ती राहील.

### कलम २.

गंगा यमुना या नद्यांच्या मधील देश ज्यास, दुआब (अंतरवेद) ह्मणतात हा प्रदेश व यांतील किल्ले, जयपूर, जोनपूर, गोहद, या त्रिवर्ग राज्याचे मुलखाचे उत्तरे कडील मुलुख, व त्यांतील किल्ले, जे हल्लीं शिंदे अलिजा बाहादर याचे ताब्यांत आहेत, सदरील मुलूख, किल्ले याजवर जो शिंदे सरकारचा राजकीय हक्क आहे, तो कंपनी सरकारास व त्याचे दोस्तास महाराज दौलतराव शिंदे याणीं निरंतर दिला आहे. जयपूर, व जोनपूर चे राज्याचे मध्य भागीं, व जयपूरचे दक्षिणेस, जो शिंदे सरकारचा ताब्यांत पूर्वी पासून मुलुख असेल, तो दौलतराव महाराज याचे कबज्यांत राहील.

### कलम ३.

या तहनाम्यातील कलम ८ यांत जो मुलुख महाराज दौलतराव शिंदे याजकडे ठेवण्याचा ठरला आहे, तो खेरीज करून अहंमदनगर, व भडोच, हे दोन किल्ले व त्या लगतचा मुलुखावर महाराज दौलतराव शिंदे याचा जो राजकीय हक्क आहे, तो कंपनी सरकारास व त्यांचे दोस्तास महाराज दौलतराव शिंदे याणी निरंतर दिला आहे.

### कलम ४

अजंठ्याचे घांटाचे दक्षिण बाजू पासून गोदावरीचे मध्यचा मुलूख, परगणे जालनापूर व परगणे गांडापूर इतका मुलूख, लढाई सुरू होण्या पूर्वी महाराज दौलतराव शिंदे यांचे ताब्यांत होता, तो सर्व मुलु

## कलम ५.

या तहनाम्यातील कलम २, ३, ४ यांत लिहिलेला मुलूख
व किल्ले, जे कंपनी सरकारास व त्याचे दोस्तांस देण्यांत आले आहे
त्यावर खुद्द दौलतराव महाराजांचा, व त्याचे वारसाचा, हरएक प्रका-
रचा हक्क संबंध असेल, तो महाराज दौलतराव याणीं सोडून दिला
आहे. कंपनी सरकार व त्याचे दोस्त, दक्षिणच्या सुभेदार, पेशवे, आ-
नंदराव गायकवाड, यांवर महाराज दौलत राव शिंदे यांचे कोणतेहि
प्रकारचे दावे असतील, ते महाराज दौलतराव शिंदे याणीं सोडून दि-
ले आहेत.

## कलम ६.

अशीरगड, पवनगड, दोहद, हे तीन किल्ले, शहर बऱ्हाणपूर,
गुजराथ आणि खानदेशांत या तीन किल्ल्या लगतचा मुलुख महाराज
दौलतराव शिंदे यांस परत देण्यांत येईल.

## कलम ७.

या तहनाम्यांतील दुसरे कलमांत जो कंपनी सरकारास मुलूख
द्यावयाचा नमूद केला आहे, त्यांत महादजी शिंदे यांचे आमात्या-
व इतर सरदारांच्या जाहागिरी सामील जाहाल्या आहेत, त्या कंपनी-
चे ताब्यांत मुलुख गेल्यानें बंद होतील, तसेच राजखेडा व ढोलपूरबा-
री हे दोन माहाल हिंदुस्थानचे बादशाहानें शिंदे सरकारचे कुटुंबास इना-
म दिले आहेत. हे दोन माहाल व सरदारांच्या सदरीं लिहिल्या जाहा-
गिरी, सदरील मुलखांतून वजा व्हाव्या ह्मणून महाराज दौलतराव यां-
चें ह्मणणें आहे. यावरून असें कबूल करण्यांत येतें कीं, ढोलपूरबा-
री, व राजखेडा हे दोन माहाल महाराजांचे ताब्यांत राहातील, बाबा-
ई साहेब, मनसूरशाह, तुलसी कवलनयन, बुगाजी जामदा, आबा-
जी जाधव, वरधवारी, या सर्वांच्या जाहागिरी कंपनी सरकार चालवि-
तील. हा मुलूख कंपनी सरकारचे ताब्यांत आल्यानें कोणाचें नुकसान

होऊं नये व कोणास उपद्रव लागूं नये, ह्मणून ज्या लोकांचें नुकसान हो त असेल, त्या लोकांची याद महाराजांनीं द्यावी ह्मणजे कंपनी सरकार त्या लोकांस जाहागीर मुलुख, अथवा पेनशनें नेमून देतील, सदरील असामीस जी जाहागीर चालु विण्याची ठरली आहे, त्याची व नवीन लोकांची याद देतील, त्याची एकंदर बेरीज सत्रा लक्षांहून ज्यास्त होऊं नये. सरदार लोकांचे जाहागीर मुलखांत, आणि ढोलपूरबारी व राजखेडा या दोन माहालांत, वसूलाचे वगैरे निमित्यानें महाराजां कडील फौज जाऊं नये.

## कलम ८.

पंत प्रधान यांचे राज्यांत महाराज दौलतराव शिंदे यांचे इनामगांव व जमीनी, फार दिवसापासून माहाराजांचे घराण्यांत चालत आल्या आहेत त्याचा तपशील.

| | |
|---|---|
| १ प्रगणे चांभारगोंदे. | १ जामगांव |
| १ राजणगांव | १ प्रगणे शेवगांव निमें. |
| १ प्रगणे आंबड पैकीं ६ गांव. | १ प्रगणे पैठण पैकीं ५ गांव. |
| १ प्रगणें नेवासें पैकीं ५ गांव. | १ प्रगणे कडे पैकीं ५ गांव |
| १ पुण्या प्रगण्यातील ६ गांव. | १ मांन वाई पैकीं २ गांव |
| १ प्रगणे पाटोदे पैकीं ६ गांव. | १ प्रगणे पांडे पेडगांव पैकीं ५ गांव. |
| १ प्रगणे पागुड पैकीं ५ गांव. | १ प्रगणे पारनेर पैकीं २ गांव. |

सदरहू गांव कंपनी सरकार व त्यांचे दोस्तानीं हल्लीं घेतलेले आहेत, ते महाराज दौलतराव यांस परत देण्यांत येतील. वसूलाचे सबबेनें या गावांत महाराजांकडील फौज येऊं नये.

## कलम ९.

महाराज दौलतराव शिंदे यांचे ताब्यांतील कितीएक रजवाड्यांशीं कंपनीसरकारानें तहनामे केले आहेत, ते महाराज दौलतराव शिंदे मजूर करितील, व हे रजवाडे महाराज दौलतराव यांचे इलाख्यांतून स्वतंत्र जाहले आहेत, असें समजून यांस महाराजा कडून हरएक

मी दिला असेल,त्यास या तहनाम्या वरून बाध येणार नाहीं. ज्या लोकां शीं कंपनी सरकारानें तहनामे केले आहेत,त्याची नावनिशीनी यार हात हनामा मंजूर जाहाल्यावर मग कंपनी सरकार, दौलतराव महाराजांस दे ईल.

## कलम १०.

हल्लींचे लढाईत कोणी मनुष्य सामील असेल तर,त्यास लढाईचे कारणावरून कोणी उपद्रव लाऊंनये.

## कलम ११.

माळवा प्रांतांत जो अंमल पेशव्यांचा असेल तो,पेशव्यांकडे सरळी तचालवावा,या बाबती पेशव्याचा आणि शिंद्याचा जर तंटा उत्पन्न होईल,तर त्याचा इनसाफ कंपनी सरकार मध्यस्त होऊन न्यायानें करितील,तो उभयतांनीं मान्य करून अमलांत आणावा.

## कलम १२.

दिल्लीचे बादशाहावर महाराज दौलतराव याचा ताबा होता. तो महाराजांनीं सोडला आहे या पुढें बादशाहाचे कामात महाराजांकडून दखल राहणार नाहीं.

## कलम १३.

कोणी फ्रेंच,अमेरिकन्,किंवा दुसरे युरोपियन जातीचे लोक,जे कंपनी सरकाराशीं विरुद्ध असतील,त्यांस किंवा कंपनी सरकारचे ताब्यांतील रयते पैकीं,कोणी नेटीव,किंवा ब्रीटिश जातीचा मनुष्यास कंपनी सरकारचे संमती वांचून,दौलतराव महाराज आपले चाकरींत ठेवणार नाहींत.

## कलम १४.

शिंदे व कंपनी सरकार या उभयतांत हल्लींचे तहनाम्यावरून जी दोस्ती जाहाली आहे,ती कायम राहून वृद्धिंगत करण्या करितां परस्परांचे वकील एकमेकांचे दरबारांत राहातील.

A3

## कलम १५.

निजाम, पेशवे, याणीं कंपनी सरकाराशीं तहनामे करून त्याची- फौज आपले राज्याचे रक्षणा करितां बाळगली आहे, तशी फौज आपले राज्याचे रक्षणा करितां बाळगावी असें दौलतराव महाराजांचे मनांत येईल तर, कंपनी सरकार आपली फौज महाराजांचे राज्य रक्षणा करितां देण्यास तयार आहे, या फौजे बद्दलचा खर्च या तहनाम्यातील कलम २।३।४ यांतजो मुलूख कंपनी सरकारांत देण्यात आला आहे, त्यांतून भागविला जाईल. जर करितां फौज पतकरण्याचे महाराज नामंजूर करतील तर त्यामुळें या तहनाम्यास बाधयेतो असें समजूनये.

## कलम १६

ह्यातहनामा दौलतराव महाराज याणीं आठदिवसांत मंजूर करून वेलसली साहेबांस द्यावा

या तहनाम्यावर नामदार गवरनर जनरल यांची सही करून तीन महिन्यांत ह्या तहनामा वेलसली साहेब महाराजांकडे पाठवितील.

जो मुलुख कंपनी सरकारास देण्याचें महाराजांनीं यातहनाम्यांत कबूल केलें आहे, त्याच्या सोड चिठ्या वेलसली साहेबाचे हवालीं महाराजानीं कराव्या. हा मुलूख कंपनी सरकारचे अंमलदाराचे हातांत आल्या खेरीज, अशरगड, पवनगड, दोहद, हे तीन किल्ले वत्या लगतचा मुलूख महाराजांचे अमलदाराचे ताब्यांत कंपनी सरकार देणार नाहीं.

हा तहनामा करण्या करितां उभयतां सरकारचे अमलदार- होते त्याचा तपशील.

| निसबत कंपनी सरकार. | निसबत शिंदे सरकार. |
|---|---|
| १ आरथर वेलसली. | १ विठल महादेव. |
| | १ कवलनयन. |
| | १ येशवंतराव घोरपडे. |
| | १ नारो हरी. |

# नंबर ७.

तहनामा मुक्काम बऱ्हाणपूर तारिख २३ मार्च सन १८०४.

उभयतां सरकारांत गेले तहनाम्या पासून ईश्वराचे कृपेनें दोस्ती जाहली आहे. उभय सरकार, व त्याचे दोस्त व उभयतांचे ताल्यांतील लोक, यांवर कोणी गनीम येऊन विनाकारण उपद्रव करील तर, त्याचें निवारण उभयतां मिळून करीत जावें, उभयतांतून एकावर कोणी गनीम उठल्यास त्याचे शासनास परस्परांनीं एकमेकास मदत करून, परस्परांनीं एकमेकाचा सांभाळ करावा, ह्मणून हा तहनामा ठरविला आहे.

## कलम १.

गेले तहनाम्या वरून जी उभयतां सरकारांत दोस्ती जाहली आहे, ती कायम राहून दिवसें दिवस वृद्धिंगत होत जाईल, एका सरकारचे जे दोस्त अगर दुसमान असतील, ते दोन्ही सरकारचे होतील. इतउत्तर उभयतां सरकारचें नफा नुकसान निराळें न समजतां एकत्र आहे असें समजलें पाहिजे.

## कलम २.

उभयतांतून एका सरकारावर, कोणी मनुष्य अथवा एकादें संस्थान विनाकारण एकादी अन्यायाची आगळीक करील आणि त्या आगळिके बाबद त्या संस्थाना कडून, अथवा मनुष्या कडून, वाजबी जबाब अथवा नुकसान भरून मिळेल तर, उभयतांनीं त्या संस्थाना विरुद्ध अथवा मनुष्या विरुद्ध, जो योग्य उपाय पाहिजे तो उभयतांनी योजावा, ह्मणजे दौलत राव महाराज यांचे मुलुखावर कोणी गनिम येऊन उपद्रव करील तर, त्याचें निवारण करण्यास कंपनी सरकार मदत करील, व कंपनी सरकारावर कोणी गनिम उठल्यास त्याचे निवारणास शिंद्यां कडून मदत व्हावी.

## कलम ३.

या तहनाम्याचा उद्देश सिद्धीस जाण्या करितां, महाराजदौ-

लत राव यांचे राज्याचे सरहद्दी वर महाराजांचे राज्याचे बंदोबस्ता करितां,कं पनी सरकार साहाहजार पायदळ फौज ठेवील,ही फौज त्या तहनाम्याचा हेतू सिद्धीस नेण्या करितां कोणतेही कामावर जाण्यास तयार राहील.

कलम ४.

या फौजेचा खर्च पूर्वीचे तहनाम्यांत जो मुलुख कंपनी सरकारास- शिंद्या कडून मिळाला आहे,त्या तून केला जाईल,ह्मणून पूर्वीचे तहनाम्यांत- ठराव आहे त्या प्रमाणें या फौजेचा खर्च कंपनी सरकार पूर्वी मिळालेले- मुलखाचे उत्पन्ना तून भागवील.

कलम ५.

या तहनाम्याचे ठरावा अन्वयें जी फौज महाराजांचे राज्याचे सरह- द्दीवर कंपनी सरकार ठेवील,अथवा प्रसंगानुसार ज्यास्त फौज आणून दो- न्ही फौजा महाराजांचे राज्यांतील बखेडा मोडण्या करितां महाराजांचे मुल- खांत हिंडूं लागतील,तेव्हां त्या फौजेचे निरवाहा करितां धान्य, कापड, जनावरें, वगैरे जे अवश्य सामान लागेल,त्यास महाराजा कडील जकाती- ची माफी असावी,महाराजाची फौज कारणा परत्वें कंपनी सरकार चे मुलखां त येईलतर,तीस जें सामान अवश्यलागेल त्यास कंपनी सरकारांतून जका तीची माफी राहील. या तहनाम्याचा उद्देश पुराकरण्या करितां उभयतां स- रकारचे अंमलदार फौज बरोबर अथवा फौजे खेरीज एकमेकाचे मुलखां त हिंडतील,तेव्हां त्याचा मान मरातब परस्परां सरकारांतून ठेवण्यांत यावा.

कलम ६.

खुद्द महाराजांचे जातीचे अगर त्याचे वारसाचे रक्षणास किंवा महा- राजांचे राज्यांत बंड जाहालें तरीं,त्याचे पारपत्यास असे मोठे कामास ही- फौज लावीत जावी,किरकोळ कामांत या फौजेची योजना करूं नये.

कलम ७.

कंपनी सरकारचे संमती वांचून कोणी फ्रेंच,जातीचे मनुष्यास आह्मी आपले नौकरींत ठेवणार नाही. कोणी युरोपियन किंवा अमेरिकन जातीचे लोकांचे कंपनी सरकाराशीं वितुष्ट पडलें असेल तर,त्या लोकास कंपनी- सरकारचे संमती वांचून आह्मी चाकरीस ठेवणार नाही,व आपले मुलखां

न राहूं देणार नाहीं, असें महाराजांनीं कबूल केलें आहे, महाराजांचे राज्यांतील कोणी रयत मनुष्य अथवा गुन्हेगार कंपनी सरकारचे राज्यांत येऊन राहील, किंवा कंपनीची चाकरी करूं ह्मणेल तर, त्या मनुष्यास महाराजांचे संमती वांचून कंपनी सरकार आपले मुलखांत अगर चाकरींत ठेवणार नाहीत.

## कलम ८.

हल्लींचे तहनाम्यावरून उभय सरकाराची दोस्ती इतकी वाढली आहे कीं, त्यांत द्वैत भाव नराहून उभयतांचें एकच राज्य आहे असें समजलें पाहिजे. महाराज दौलतराव शिंदे असें कबूल करतात कीं, आह्मी कोणतेही परदरबाराशीं अगर संस्थानाशीं कंपनी सरकारचे संमती वांचून तहाचें बोलणें अथवा काम चालविणार नाहीं, कंपनी सरकार असें कबूल करतात कीं, महाराजांचे आप्तविषयी, पदरचे सरदार, आश्रित, चाकर यांवर महाराजांची पूर्ण सत्ता राहील, या लोकां पैकीं कोणी ही मनुष्य बेमान होऊन महाराजांची अवज्ञा करूं लागेल, आणि त्यास शिक्षा करण्याचे महाराजांचे मनांत येऊन, ते कंपनी सरकारची मदत मागतील तर, कंपनी सरकारांतून मदत होईल, कंपनी सरकारचा कोणीही अमलदार महाराजांचे राजकारभारांत हात घालणार नाही.

## कलम ९.

उभयतां सरकारचे राज्यावर, व उभयतां सरकारचे दोस्तांवर व आश्रितांवर कोणी गलीम उठून उपद्रव करूं लागेल तर, त्या पासून उभयतांचे राज्याचा, दोस्तांचा, व आश्रितांचा बचाव व्हावा ह्मणून हा तहनामा उभयतां सरकारानीं केला आहे, कंपनी सरकारची ज्या संस्थानाशीं अगर मनुष्याची दोस्ती असेल, त्यावर अथवा दुसरे कोणतेही संस्थानावर अगर दरबारावर आह्मी स्वारी अगर हल्ला करून जाणार नाहीं असें महाराज दौलतराव शिंदे कबूल करीत आहेत, कोणतेही संस्थानी काशीं महाराज दौलतराव शिंदे यांचा कलह उत्पन्न होईल तर, त्याचा इनसाफ सत्य आणि न्यायाचे तराजूनें कंपनी सरकार करील, तो महाराज दौलतराव यांस मान्य होईल.

## कलम १०.

कंपनी व शिंदे सरकार हे उभयतां असें कबूल करितात कीं, कोणतें संवस्थान आह्माशीं बिघडल्यास, त्याशीं सख्य होण्याचे जे उपाय असतील ते दोन्ही सरकारानीं अगर एकानें करावे, आणि जिकडून लढाईचा प्रसंग टळेल, ते इलाज करावे, असे इलाज थकून लढाईचा प्रसंग येई-लतर, इंग्रज सरकारची साहा हजार फौज व तोफखाना जो आमचे सरहद्दीवर राहील, त्याचे मदतीस महाराज दौलतराव आपले सैन्या पैकीं साहा हजार पायदळ, व दाहा हजार स्वार देतील, आणि हें सर्व सैन्य शत्रूचे नाशाकरितां लावावें, असें दौलतराव महाराज कबूल करतात. या-शत्रूचे नाशाकरितां आणखी सैन्याची अवश्यकता पडल्यास, आपल्या राज्यांतील आणखी जितकी फौज देण्या सारखी असेल, तितकी महाराज देण्यास अनमान करणार नाहींत, कंपनी सरकार ही असें कबूल करतात कीं; शिंदे सरकारावर जर असा प्रसंग येईल तर, आह्मी ही तुमचे राज्या नजीक जी फौज ठेविली आहे, त्या पेक्षां आणखी फौज देत जाऊं.

## कलम ११.

जेव्हां लढाई होण्याचा प्रसंग दिसूं लागेल, तेव्हां आपले सरहद्दीवरील छावणीत धान्य संग्रह करून ठेऊन, वंजारी लोक, महाराज दौलतराव शिंदे जमा करण्याची तजवीज करतील. कंपनी सरकार ही आपले सर हद्दीवर सदरहू प्रमाणें तजवीज ठेविण्याचे कबूल करीत आहेत.

## कलम १२

दुसऱ्याचें राज्य काबीज करून आपल्या राज्याची सीमा वाढवावी, असें कंपनी व शिंदे सरकारचे मनांत नाहीं, परंतु कोणातेही परदरबार अगर संस्थान अन्यायानें विना कारण युद्धास प्रवर्त होऊं लागेल तर, त्याची समजूत उभयतां सरकारानीं करावी, जर करितां समजूत न होतां युद्धाचा प्रसंग येईल तर, उभयतां सरकारा कडून यात हनाम्यांतील करारा प्रमाणें सर्व प्रकारची परस्परा कडून मदत जाहाली असेल तर, लढाईचा फायद्याची वांटणी उभयतां सरकारांत बरोबर करण्यांत येईल.

## कलम १३

कंपनी सरकार व शिंदे सरकार याउभयतां सरकारची न-फानुकसानाची या तहनाम्यावरून सलग्नता जाहाली आहे, आस्तव कंपनी सरकारचे राज्यांत दुसरे ठिकाणीं फिसाद अगर बंड उत्पन्न होईल तर, शिंदे सरकारचे मदतीस ठेविलेली फौज कंपनी सरकार ते बंड मोडण्या करितां नेईल. या तहनाम्या वरून ज्या उद्देशानें ही फौज मदतीस ठेवण्यांत आली आहे, ती दुसरे कामास लाविली असतां या उद्देशास बाध येणार नाहीं. जर कंपनी सरकारचे सरहद्दी नजीक महाराज दौलतराव यांचे मुलखांत दंगा होईल, आणि तो मोडण्या करितां मदतीस ठेविलेली फौज आणली असतां गैर सोय होईल तर, कंपनी सरकारची जी सरहद्दी नजीक दुसरी फौज असेल ती पाठऊन, तो दंगा मोडण्याचें दौलतराव महाराज ह्मणतील तर, तसें कंपनी सरकारांतून होईल, त्याच प्रमाणें महाराज दौलतरावाचे राज्याचे सरहद्दी नजीक कंपनी सरकारचे मुलखांत दंगा होईल तर, कंपनी सरकारानें दौलतराव महाराजाची फौज हा दंगा मोडण्यास मागितली असतां महाराज दौलतराव आपली फौज देतील.

## कलम १४.

कंपनी व शिंदे सरकारची दोस्ती कायम राहाण्या करितां, उभयतां सरकार असें कबूल करितात कीं, जे एका सरकारचे खंडणीदार असतील त्याशीं दुसऱ्या सरकारानें निराळ्या दोस्तीचा तह करूं नये. कंपनी व शिंदे सरकार ह्या उभयतांचा स्वतंत्र अधिकार कायम राखण्या करितां असें ठरविण्यात येतें कीं, उभयतां पैकीं एका सरकारचे ताल्यांतील कोणी खंडणीदार, अगर एकादा रयत मनुष्य बंड फिसाद करील तर, त्यास दुसऱ्या सरकारानें आश्रय देऊं नये, अगर पाठीस घालूं नये, असे बंडखोर लोकांस धरून शिक्षा देण्याचा जो इलाज असेल तो उभयतां सरकारानीं करावा.

## कलम १५.

महाराज दौलतराव शिंदे यांचा व त्याचे खानदानीचा पेशव्या

कडून हरएक प्रसंगास मानमरातब ठेवण्याचा जो पूर्वापार शिरशिस्ता चालत आला असेल, तो कंपनी सरकारांतून कायम ठेवण्यांत येईल. महाराज दौलतराव शिंदे यांचे ताब्यांत पेशव्यांचे सनदे वरून अथवा लेखा वरून अथवा बिन लेखावरून जो मुलूख हल्ली असेल, त्याव र दौलतराव महाराजांची पूर्वी चालत आल्या प्रमाणें मालकी आहे, असें कंपनी सरकार कबूल करीत आहे, परंतु सदरहू सनदे वरून या तहनाम्या तील कोणतेही कलमास बाध येणार नाहीं. एकादे ठिकाणीं लेखा वांचून वहिवाट चालत असेल, आणि त्या बद्दल तंटा उत्पन्न होईल तर, त्याचा कंपनी सरकार न्यायानें आणि सत्यानें जो इनसाफ करील, तो अलिजा बाहादर दौलतराव यास मान्य होईल. खुद्द अलिजा बाहादर दौलतराव व त्याचे पूर्वज यांस पेशव्यानी व त्याचे पूर्वजानीं जो अधिकार दिला असेल, त्यांत पेशवे घालमेल करूं लागतील तर, पेशव्याचे धनी प्रणास, आणि या तहनाम्याचे उद्देशास बाध न येतां, अलिजा बाहादराचा अधिकार कायम राखण्या विशीं, कंपनी सरकारां तून इलाज होण्यास हयगय होणार नाहीं.

## कलम १६.

कंपनी सरकारचे बतीनें मेजर मालकम साहेब, व महाराज अलिजाबाहादर दौलतराव शिंदे याचे तर्फे मुनशी कवलनयन व विठल पंत यांणीं मुक्काम ब-हाण पूर येथें तारिख २७ फेब्रुवारी सन १८०४ इसवी रोजीं सदरील सोळा कलमाचा तहनामा करविला आहे. तो नामदार गवरनर जनरल यांणीं तारिख ३१ सन १८०४ इसवी रोजीं मंजूर केला आहे.

---

## नंबर ८.

तारिख ३० दिजंबर सन १८०३ इसवी रोजीं सरजे अंजन गांवीं कंपनी व शिंदे सरकारचा तहनामा ठरला त्यांत कांहीं संशय उत्पन्न जाहाला आहे. तो निवृत्त करण्या करितां

हा तहनामा ठरविण्यांत आला आहे मुक्काम मुस्तापूर तारिख २२ नवंबर सन १८०५.

## कलम १.

सरजे अंजनगांव मुक्कामीं कंपनी व शिंदे सरकारांत जनरल आर थर वेलसली साहेब याचे विद्यमानें तहनामा जाहाला आहे, त्यांत या तहनाम्या वरून जो फेरफार होईल, तो खेरीज करून बाकी शिंदे व कंपनी सरकारांत सरजे अंजन गांवचा तहनामा कायम राहिल.

## कलम २.

सरजे अंजन गांवचे तहनाम्या वरून ग्वालेरच्या किल्ल्यावर, आणि गोहद प्रगण्यातील मुल्खावर, महाराज अलिजा बाहादर दौलतराव शिंदे यांचा कोणतेही प्रकारचा हक्क आहे असें कंपनी सरकार कबूल करीत नाहीं. तथापि महाराज अलिजा बाहादर दौलतराव यांची व कंपनी सरकारची दोस्ती सबब ग्वालेरचा किल्ला व गोहद प्रगण्यातील मुल्ख महाराज दौलतराव शिंदे अलिजा बाहादरांस देण्याचें कंपनी सरकार कबूल करीत आहेत. जो मुल्ख देण्याचें ठरलें आहे त्याची याद + अलाहिदा या तहनाम्या लगत केली आहे.

## कलम ३.

गोहदचे राण्याचे गुजाऱ्याची तजवीज आह्मीं ठेवितों, आणि गोहद प्रगण्यातील मुल्ख व ग्वालेर किल्ला तुह्यांस देतों असें कंपनी सरकारानें कबूल केल्यावर, त्याचे बद्दल सरजे अंजन गांवचे तहनाम्यांत १५ लक्षांची नेमणूक महाराज दौलतराव याचे पदरचे सरदारास कंपनी सरकारानें देण्याचें कबूल केलें होतें, या नेमणुकी वरील महाराज दौलतराव शिंदे यांणीं आपला हक्क तारिख १ ज्यानेवारी सन १८०६ पासून सोडण्याचें कबूल केलें आहे. गोहद प्रगणा व ग्वालेर किल्ला कंपनी सरकारानें महाराज दौलतराव शिंदे यांस दिला. त्यारेणगी बद्दल पंधरा लक्षांचे नेमणूके वर महाराज दौलतराव शिंदे अलिजाबाहादर याणीं वेदावा दिला असे.

---

+ मुल्खाचे यादीचा तरजुमा करून घेतला नाहीं.

कलम ४.

तारीख ३१ दिजंबर सन १८०५ इसवी रोज अखेर, प्रगणे ढोळपूर व राजखेडा येथील जो वसूल कंपनी सरकारांत आला असेल तो, व सदर तारिखे पर्यंत पेनशिन बद्दल जो पैसा कंपनी सरकारानें देणें असेल, ती एकंदर रकम अलिजाबाहादर दौलत रावास देण्यास कंपनी सरकार कबूल करीत आहे, परंतु त्यांत खाली लिहिलेल्या रकमा वजा करून, बाकी राहील ती रकम अलिजा बाहादर दौलतराव महाराजांस देण्यात येईल.

१ बापू शिंदे व सदाशीव राव हे दोघे कंपनी सरकाराशीं वैरभावानें वागूं लागले, ते दिवसा पासून त्यांचा पेनशिना वरील हक्क बुडाला.

१ इंग्रज सरकारचे रसिडेनशी लुटल्या बाबत नुकसान.

१ मिस्तर जनकीन साहेबानें अलिजा बाहादराचे स्वारांस पैसा दिला आहे तो.

१ प्रगणे राजखेडा व ढोळपूर बारी येथील वसूला बद्दल महाल मजकूर खर्च.

कलम ५.

हिंदुस्थानांतील राज्यांत कंपनी सरकार व शिंदे सरकारचे राज्याची सरहद्द चंबल नदी ठरविली आहे, तिचे उत्तरे कडील बाजूस, पूर्वेस गोहद आणि पश्चिमेस कोट्या पर्यंत, अलिजा बाहादर दौलत राव शिंदे यांचा अंमल बिलकुल नाहीं, व चंबल नदीचे दक्षिण बाजूस कंपनी सरकारचा अंमल बिलकूल नाहीं, असें उभयतां सरकारानीं ठरविलें आहे. भेडक आणि कशी पुरा हे दोन तालुके यमुना नदीचे किनाऱ्यावर आहेत, ते कंपनी सरकारचे ताब्यांत राहतील.

कलम ६.

या तहनाम्यातील पांचवे कलमांत उभयतां सरकारची सरहद्द चंबल नदी ठरली आहे, तिचे उत्तर बाजूस बुंदीचा राज्यावर, व इतर लोकांवर महाराज अलिजा बाहादर यांचा खंडणी घेण्याचा हक्क होता,

ती महाराज दौलतराव अलिजा बाहादर यांणीं सोडला आहे. टांक, रामपुरा, भारनगांव, जिमीदा, ढोलपूर, राजखेडा, आणि बारी हा मुलूख कंपनी सरकारचे ताब्यांत राहील.

कलम ७.

उभयतां सरकारानीं चंबल नदीची सरहद्द ठरविली, तेणें करून कंपनी सरकारास फायदा जहाला, तो व महाराज अलिजा बाहादर दौलतराव यांची कंपनी सरकाराशीं दोस्ती जाहाली, हे सर्व प्रकार मनांत आणून कंपनी सरकार सालिना च्यार लक्ष रुपये खुद अलिजा बाहादर दौलतराव यांस, पेनशिन देण्याचें कबूल करीत आहेत, ही रकम रसिदेन्ट मार्फत तिमाही हाप्ते बंदीनें दरसाल महाराज अलिजा बाहादरांस आदा होत जाईल. याशिवाय महाराज अलिजा बाहादर दौलतराव यांची राणी बायजा बाईसाहेब यांस बाळाबाई प्रमाणें कंपनी सरकार आपले हिंदुस्थानांतील राज्यांत दोन लक्षांची जाहागीर, व महाराजांची कन्या चिमणा जी बाई इजला, एक लक्षाची जाहागीर एकूण तीन लक्षाची जाहागीर देण्याचें कबूल करीत आहेत.

कलम ८.

उदेपूर, जोतपूर, कोटा, येथील राजाशीं व माळवा, मारवाड, मेवाड प्रांतांत जे संस्थानीक, व खंडणी दार महाराज अलिजा बाहादराचे असतील, त्यांशीं कंपनी सरकार पृथक तहनामे करणार नाहींत व महाराज अलिजा बाहादराचे सदरील संस्थानिका पाशीं जे करार वगैरे ठरले असतील, त्यांत आह्मीं हात घालणार नाहीं असें कंपनी सरकार कबूल करीत आहे.

कलम ९.

येशवंतराव होळकराशीं कंपनी सरकाराची हल्लीं लढाई चालू आहे, त्याचा मोड करण्याचा इलाज सरू आहे, कदाचित् कंपनी सरकाराचा व होळकराचा तहनामा अगर समजूत जहाल्यास, माळव्यांत चंबल आणि तापी नद्यांचे मध्य भागचा होळकराचा मुलूख जो महाराज दौलतराव शिंदे यांणीं घेतला असेल, तो होळकरास परत देण्या विषयीं येशवंतराव

शीं कंपनी सरकार करार करणार नाहीं. यामुलखाची येशवंत रावा बरोबर अ थवा होळकराचे घराण्यातील दुसरे माणसा बरोबर, हवी तशी व्यवस्था कर ण्यास अलिजा बाहादर दौलतराव मुखत्यार आहेत. चंबल नदीचे दक्षिणे स आणि तापीनदीचे उत्तरेस जो होळकराचा मुलूख असेल, अथवा यामु लखांतील राजे रजवाडे लोकांकडे खंडण्या घेणें असतील, त्याची ही हवी तशी व्यवस्था अलिजा बाहादर दौलतराव यांणीं केल्यास, ते मुखत्यार आहे त. तापि आणि चंबल या दोन नद्यांचे मध्य भागीं जो होळकराचा फारदिव शीं मुलूख व दावा असेल, त्याची व्यवस्था होळकराशीं अगर त्याचे कुटुंबाशीं हवी त्यारीतीनें अलिजा बाहादर दौलतराव यांणीं केल्यास हरकत नाहीं, त थापि या व्यवस्थे पासून एखादा तंटा अगर लढाई उत्पन्न जाहली असतां त्यांत कंपनी सरकार सामील होणार नाहीं, असें पक्कें समजावें.

## कलम १०.

सरजेराव घाटगे यांणीं उभय सरकारचे दोस्तींत व्यत्यय आणिला होता, या करितां त्यांस अह्मीं दरबारांतील कोणतेही कामावर ठेवणार नाहीं, व त्यांस कोणते ही मसलतींत घेणार नाहीं, असें अलिजा बाहादर दौ लतराव शिंदे कबूल करीत आहेत.

## कलम ११.

कंपनी सरकार तर्फे मेजर मालकम साहेब, व शिंदे अलिजा बाहा दर यांचे तर्फे मुनशी कवलनयन, या उभयतांनीं हा अकरा कलमांचा त हनामा ठरविला आहे, यावर नामदार गवरनर जनरल व महाराज अलि जा बाहादर दौलतराव शिंदे यांच्या सह्या एक महिन्यांत करून उभयता नीं तहनाम्याच्या नकला एकमेकांस द्याव्या असें ठरविलें आहे.

| मुक्काम मुस्तापूर तारिख २२ नवंबर सन १८०५ | जान मालकम. कवलनयन. |
|---|---|

---

## नंबर ९.

सदरील तहनाम्यातील कलम ५।६।७ यांतील मजकुरा बद्दल कां हीं तक्रार उत्पन्न जाहाली आहे, यास्तव सदरील तीन कलमा ऐवजीं पुढील

दोन कलमें ठरविण्यांत आलीं आहेत.

## कलम १.

हिंदुस्थानांत कंपनी व शिंदे सरकार या मुलूख आहे, त्यांत उभयतां स गैर सोय नव्हावी, ह्मणून असें ठरविण्यांत येतें कीं, सरजे अंजनगा वचे तहनाम्यातील कलम ७ यावरून चंबल नदीचे उत्तरे कडील दोल पूर, बारी, आणि राजखेडा, हे तीन महाल महाराज दौलतराव शिंदे यांस देण्याचें ठरलें आहे, हे महाल महाराज दौलत राव ह्यांणीं कंपनी सरकारास परत दिले आहेत, सदरहू नदीचे दक्षिणेस कंपनी सरका राचा जो मुलूख किंवा खंडणी अथवा हरएक प्रकारचा अंमल असेल, त्यावरील कंपनी सरकारानें बेदावा दिला आहे. तथापि भेडग आणि- कशीपुरा हे दोन तालुके यमुनानदीचे कांठीं आहेत, ते कंपनी सरकारचे ताब्यांत राहातील.

## कलम २.

कंपनी सरकारची व महाराज दौलतराव शिंदे यांची अतिशय दोस्ती समजून, महाराज दौलतराव यास सालिना चार लक्ष रुपये पेन शिन कंपनी सरकार देत जाईल, ते रसिदेन्ट साहेबाचे मार्फत हासेबंदीनें महाराजांस आदा होत जाईल. हिंदुस्थानांत जी कंपनी सरकारचा मुलू ख आहे, त्यांत बाळाबाईस जशी जाहागीर होती, त्या प्रमाणें बायजाबाईस दोन लक्षाची, व महाराजाची कन्या चिमणाबाईस एक लक्षा ची एकूण तीन लक्षाचा जाहागीर मुलूख दोघींस कंपनी सरकार नेमून देतील.

मुक्काम इलाबाद तारिख ३-<br>दिजंबर सन १८०५. } जी. एच्. बारलो.

---

## नंबर १०.

पेंढारी लोकांचा दंगा सर्व हिंदुस्थानांत जाहला- आहे, त्याचा बीमोड करावा, ह्मणून कंपनी व शिं- दे सरकार या उभयतांचे मनांत आल्यावरून उ- भयतांनीं तहनामा ठरविला तो तारिख ४ नवंबर

सन १८१७ इसवी.

कलम १

पेंढारी लोकांचा पाठलाग करून त्यांस त्यांचे लपण्याचे ठिकाणांतून हांकून द्यावें, व ते पुनः एकत्र न होत, अशी तजवीज करण्या करितां कंपनी व शिंदे सरकारचें व त्यांचे दोस्तांचें सैन्य एकत्र होऊन पेंढारी लोकांवर हल्ला करील. पेंढारी लोकांचा मोड ज हाल्या खेरीज या फौजेचा हल्ला बंद होणार नाहीं. महाराज दौलतराव शिंदे आपले तर्फे असें कबूल करितात कीं, पेंढारी लोकांचे सरदारांस त्यांचे कुटुंबा सुद्धां पकडून आह्मीं कंपनी सरकारचे हवालीं करण्याचा यत्न करूं

कलम २.

अलिजा बाहादर दौलतराव यांचे मुलखांत व इतर संवस्थानिकांचे मुलखांतून, पेंढारी लोकांतील सरदार वस्ती करून जागोजागीं राहिले आहेत. या सरदारांस आपले राज्यांतून पिटून दिल्यावर त्यांच्या जमीनी दौलत राव महाराजानीं घ्याव्या, व पुनः त्यांस आश्रय देणार नाहीं असें अलिजा बाहादर दौलत राव यांणीं कबूल केलें आहे. दुसरे संवस्थानिकानीं पेंढारी लोकांचे सरदारांस आपले मुलखांतून हांकून देण्याचे कामीं मदत करून, पुनः त्यांस आश्रय देणार नाहीं असें ते कबूल करितील. पेंढारी लोकांच्या त्यांचे राज्यांतून जमीनी असतील त्या ज्यांच्या त्यानीं घ्याव्या, त्या संवस्थानिका कडून पेंढार मोडण्याचे कामीं मदत न होईतर, पेंढारी लोकांच्या जमीनी सर्व दौलतराव महाराज यांचे ताब्यांत राहतील.

कलम ३.

महाराज दौलतराव शिंदे पेंढारी लोकांस आपले राज्यांत आश्रय देणार नाहींत, मुलकी व लष्करी अंमलदारानीं ही या चोरटे लोकांस आश्रय देऊं नये, ह्मणून महाराजानीं आपले राज्यांत एकसाहा हुकूम दिला आहे, त्याची अवज्ञा करून कोणी कामगारानें पेंढारी लोकांस आश्रय दिल्यास, तो शिंदे सरकारचा बंडखोर आणि कंपनी सरकारचा दुसमान समजला जाईल.

## कलम ४.

महाराजदौलत राव शिंदे अलिजा बाहादर आपले राज्याचे आणि फौजचे धनी आहेत. या तहनाम्याचा हेतू सिद्धीस नेण्या करितां, पांच हजार स्वार इंग्रजी सैन्याचे मदतीस देण्याचें त्यांणीं कबूल केलें आहे, त्याच्या निरनिराळ्या टोळ्या करून दरएक टोळी कंपनी सरकारचे निसबतीच्या अंमल दाराचे ताब्यांत राहील. अशा टोळ्या जागोजागीं राहून, कंपनी सरकारचा जो मुख्य सेनाधिकारी या कामगारीस नेमला असेल, त्याचे हुकुमांत वागतील. शिंदे सरकारचे फौजेस जे कांहीं कंपनीचे मुख्य सेनाधिकाऱ्यांस कळविणें असेल तें, आपले टोळी वरील कंपनी सरकारचे अधिकाऱ्या मार्फत कळवीत जावें. कंपनी सरकारचें सैन्य पेंढारी लोकांचे नाशाकरितां जेव्हां अलिजा बाहादराचे मुलखांत येईल, तेव्हां अलिजाबाहादराचे ताब्यांतील मुलकी व लष्करी अंमल दार या फौजेस सामान वगैरे मिळऊन देण्याचे कामांत वर्तनमदन करितील. मदत वगैरे करण्यास कोणी अमल दारानें चुकवा चुकव अगर हयगय केल्यास, तो शिंदे सरकारचा बंडखोर आणि कंपनी सरकारचा दुसमान समजला जाईल, असें अलिजा बाहादर दौलत राव महाराज कबूल करीत आहेत.

## कलम ५.

कंपनी सरकारचे सैन्या बरोबर जी अलिजाबाहादराची फौज राहील, तीचा सर्व प्रकारचा बंदोबस्त अलिजा बाहादर ठेवितील. घोड्यांस चंदीचें ण व माणसास पगार वेळचे वेळेस देण्यांत येईल ह्मणून अलिजा बाहादर कबूल करीत आहेत. तथापि या बाबतींत पुढें तंटा उत्पन्न न व्हावा, ह्मणून अलिजा बाहादर असें कबूल करितात कीं, खुद्द आह्मास, व आमचे कुटुंबाचे माणसास, व परस्चे कारभाऱ्यांस, कंपनी सरकारांतून सालिना पेनशिन पावतें, तो ऐवज कंपनी सरकारानें तीन वर्षें घेऊन, आमचे फौजेचा पगार देत जावा. ही पेंढार मोडण्याची स्वारी खलास जाहाल्यावर, सदरहू पेनशिन पैकीं जो ऐवज शिलक राहिल्यास, तो अलिजा बाहादर दौलत राव यांस देण्यांत येईल, असें कंपनी सरकार कबूल करीत आहे. जोतपूर, बुंदी, आणि कोटा या

तीन संवस्थानातून खंडणीचा ऐवज शिंदे अलिजा बाहादर यांस दरसाल-
पावत असतो,हा ऐवज दोन वर्षे पर्यंत अलिजा बाहादर यानीं आपले फौजेचे प
गारा करितां कंपनी सरकारास लाऊन दिला आहे.

कलम ६.

अलिजाबाहादराचे निसबतीचे स्वार,पायदळ आणि तोफा,ज्या पेंढार
मोडण्याचे कामा करितां कंपनी सरकारचे सैन्यांत येऊन मिळतील,त्याचा निर
निराळ्या टोळ्या करून प्रत्येक टोळी कंपनी सरकारचे अमलदाराचे ताब्यां
त राहील,तो अंमलदार आपले ताब्यांतील टोळीस ज्या ठिकाणीं ठेवील,त्या
ठिकाणीं,याटोळीनें राहिलें पाहिजे,त्याचे हुकुमावांचून त्या टोळीनें आपलें
नेमलें ठिकाण सोडूंनये. इंग्रजी अंमलदाराचे हुकुमावांचून या टोळीने आप
ली नेमली जागा सोडल्यास,लढाईचे वेतास व्यत्यय येऊन त्याचा फायदा श-
त्रूस होईल,अशी धांदल आणि अव्यवस्था नव्हावी ह्मणून,अलिजा बाहादर
व कंपनी सरकार असें ठरविनात कीं, अलिजा बाहादराचे प्रत्येक फौजेचे टो
ळीस अधिकारी कंपनी सरकारचा अमलदार नेमण्यांत यावा.

कलम ७.

कंपनी व शिंदेसरकारानी जी आप आपली फौज पेंढारी लोकांचे बं
डाचे नाशाकरिता नेमली आहे ती पुरे आहे. पेंढारी लोकांचे नायक आणि
अलिजा बाहादराचे निसबतीचे फौजेंतील सरदार यांत मिलाफ न व्हावा-
ह्मणूनही पेंढार मोडण्या करितां जी लढाई हाल्लीं सुरू जाहाली आहे,ती पु
री होई पर्यंत आह्मीं आपली फौज कंपनी सरकारचे संमतीवांचून वाढवि
णार नाहीं,असें अलिजा बाहादर दौलतराव कबूल करीत आहेत. पेंढारी-
अथवा दुसरे लुटारू लोकांस कोणतेही प्रकारचा आश्रय देऊं नये,व त्यास-
आपले फौजेंत सामील करूंनये,ह्मणून अलिजा बाहादर दौलतराव याणीं
आपले फौजेतील अमलदारास सक्त ताकीद दिली आहे. या ताकिदीस अ
मान्य करून कोणी अंमलदार वागूं लागला असतां,तो शिंदे सरकारचा बंड
खोर आणि कंपनी सरकारचा दुसमान समजावा,असें अलिजा बाहादर-
दौलतराव कबूल करीत आहेत.

कलम ८.

कंपनी व शिंदेसरकारचें सैन्य एकत्र होऊन पेंढारी लोकांचे नाशास प्रवर्त जाहलें आहे, या सैन्यास सामग्री व सामानाचा पुरवठा यथास्थीतपणें व्हावा, एतदर्थ कंपनीनें सरकारचे इमानावर आणि दोस्तीवर भरवसा ठेऊन, अलिजा बाहादर दौलतराव शिंदे याणी अशारगड आणि हांड्या हे दोन आपले किल्ले ही लढाई पुरी होई पर्यंत, कंपनी सरकारचे ताब्यांत ठेवण्याचें कबूल केलें आहे. दोनी किल्ल्याचा बंदोबस्त कंपनीसरकारानें ठेवावा. अशारगडचे किल्यावर अलिजा बाहादरांचा बावटा उडावा, व तेथें एक किल्लेदार पन्नास शिपाई अलिजा बाहादराचे निसबतीतील राहतील. दोन्ही किल्यांचा अधिकार कंपनीचे अंमलदाराचे हातीं राहून, किल्यांतील सर्व सामान कंपनी सरकारचे ताब्यांत राहील. दोनी किल्ले कंपनी सरकारचे ताब्यांत देते समयीं, किल्ल्यांतील सर्व सामानाच्या यादी करून उभयतां सरकारचे किल्लेदारानीं एकमेकास घ्याव्या द्याव्या. जें सामान खर्च अथवा खराब होईल त्याची किंमत कंपनी सरकारानें महाराज अलिजा बाहादरास द्यावी. अशारगडचे किल्ल्यांत एक किल्लेदार व त्याचे तैनातीस पन्नास शिपाई ठेवावे ह्मणून सदरीं ठरलें आहे, ते लोक खेरिज करून बाकी हांड्याचे आणि अशारगडचे किल्यावर जी अलिजा बाहादराची फौज असेल, ती अलिजा बाहादरानीं किल्या वरून खालीं उतरावी, किल्ल्याचे शिबंदी विषयीं अगर बंदोबस्ता विषयीं अलिजा बाहादरानीं इत उत्तर कांहीं एक तजवीज करूं नये. अलिजा बाहादरा कडील स्वार वगैरे इतर फौज असेल तीस कंपनी सरकाराचे अंमलदार ज्या ठिकाणीं छावणी करून, रहाण्यास या तहनाम्यांतील कलम ६ यांत लिहिल्या प्रमाणें सांगतील, त्या ठिकाणी ती फौज राहील. किल्ल्याचे खर्चा करितां जो मुलूख अलिजा बाहादरानीं नेमिला आहे, तो अलिजा बाहादराचे अंमलदाराचे ताब्यांत राहील, त्यास कंपनी सरकारचे अमलदारा कडून हरयेक प्रकारें मदत मिळत जाईल. या मुलखाचा सगळा वसूल अथवा कांहीं भाग जो महाराज अलिजा बाहादराचे निसबतीचे फौजेचे खर्चा करितां लागेल, तो कंपनी सरकार घेईल आणि त्याचा खरा हिशेब ही लढाई पुरी जहाल्यावर अलिजा बाहादरास समजाविण्यांत येईल. दोनी किल्ले व त्यालगतचा मुलख

पेंढारी लोकांची लढाई समाप्त जाहल्यावर, कंपनी सरकार अलिजा बाहादरा स परत देईल, सदरील मुलखांत रहाणारे लोकांचे आणि त्यांचे मालमत्तेचें रक्षण कंपनी सरकार करील. कोणी मनुष्य आपली मिळकत घेऊन या मुलखा बाहेर जाऊं ह्मणेल तर, त्यास कंपनी सरकार मनाई करणार नाहीं.

## कलम ९.

पेंढारी लोकांचें बंड मोडावें आणि त्यांची पुनः उत्पत्ती न व्हावी, या करितां कंपनी व शिंदे सरकारानीं हा तहनामा केला आहे. पेंढारी लोकांचे नाशाकरितां कंपनी सरकारास हिंदुस्थानातील दुसरे संवस्थानि काशीं दोस्तीचे तहनामे करणे जरूर आहे, पण तारिख २२ नवंबर सन १८०५ रोजीं कंपनी सरकारचा व शिंदे सरकारचा जो तहनामा जाहला आहे, त्यांतील ८ वे कलमांत जीं संवस्थानें लिहिलीं आहेत, त्याशीं त्या कलमावरून कंपनी सरकारास तहनामें करण्याची मनाई जाहली आहे, या करितां तें कलम रद्द करून असें ठरविण्यांत येतें कीं, उदेपूर, जोतपूर, कोटा, बुंदी आणि चंबल नदीचे डावे बाजूचे कांहीं जीं दुसरीं संवस्थानें आहेत, या सर्व संवस्थानिकाशी हवे तसे तहनामे करण्यास कंपनी सरकारास मोकळीक आहे. माळवा, आणि गुजराथ प्रांतांत, जे संवस्थानिक अलिजा बाहादराचे ताब्यांत अगर खंडणीदार आहेत, त्यावर अलिजा बाहादराची जी पूर्वापार सत्ता चालत आली असेल त्याप्रमाणे चालेल, त्यांत अदला बदल करण्यास सदरील कराराव रून कंपनी सरकारास अधिकार प्राप्त होतो असें समजूं नये. चंबल नदीचे कांठचीं संवस्थानें, अथवा उदेपूर, जोतपूर, कोटा आणि बुंदी या संवस्थानाशीं कंपनी सरकारानें पृथक् तहनामे केल्यास, या संवस्थानांतून ज्या खंडण्या अलिजा बाहादरास पावत असतील, त्याची जिमा कंपनी सरकार घेईल, आणि तो ऐवज कंपनी सरकारचे रसिदेन्टाचे मार्फत महाराज अलिजा बाहादर दौलतराव यास आदा होत जाईल, असें कंपनी सरकार कबूल करीत आहे. सदरील संस्थानाचे कारभारांत कंपनी सरकाराचे अनुमता वांचून आह्मीं हात घालणार नाही, असें अलिजा बाहादर महाराज दौलतराव कबूल करीत आहेत.

## कलम १०.

सरकारा बराबर युद्धास प्रवर्त होईल, किंवा [illegible]
कांस आश्रय देईल तर, महाराज अलिजा बाहादर दौलतराव या तहनाम्यां
तील शरती प्रमाणें वागतील, आणि कंपनी सरकारास जय प्राप्त होईल तर
अलिजा बाहादरानें कल्याण व्हावें, अशी कंपनी सरकारची पूर्ण इच्छा आ
हे, या करितां असे लढाई पासून अलिजा बाहादरास ज्यास्ती मुलखाचा
वगैरे फायदा करून देण्यास कंपनी सरकार कधीही अनमान करणार नाही.

## कलम ११.

सरजे अंजन गांवीं जो उभयतां सरकारांत तहनामा जाहला आहे, तो व तारिख २२ नवंबर सन १८०५ रोजीं जो दुसरा तहनामा उभयतां सरकारांत जाहला आहे, या दोन्ही तहनाम्यांत या तहनाम्यावरून जो कंपेश जाहला असेल, तो खेरीज करून बाकी दोनी तहनामे उभयतां सरकारांत कायम राहतील.

## कलम १२.

कंपनी सरकार तर्फे कप्तान क्लोस साहेब, व अलिजा बाहादर शिंदे सरकार तर्फे रामचंद्र भास्कर, या उभयतांनीं हा बारा कलमाचा तहनामा ठरविला आहे, यावर नामदार गवरनर जनरल यांची सही पांच दिवसांत करून तहनाम्याची प्रत कप्तान क्लोस साहेब शिंदे सरकारांत देतील, व रामचंद्र भास्कर यांणीं आज सूर्यास्ताचे अगोदर त्या तहनाम्यावर महाराज अलिजा बाहादर दौलतराव यांची मखलाशी व शिक्का करून तहनाम्याची प्रत कप्तान क्लोस साहेबाचे हवाली रामचंद्र भास्कर याणीं करावी.

मुक्काम ग्वालेर तारिख ५ नवंबर सन १८१७ इसवी. — राबर्ट क्लोस. रामचंद्र भास्कर.

---

## नंबर ११.

माळव्यांतील मुलखाचा मोबदला मुक्काम ग्वालेर तारिख २५ जून सन १८१८ इ.

तारिख १३ माहे जून सन १८१७ इसवी रोजीं श्रीमंत राजश्री बाजीराव रघुनाथ पंत प्रधान याणीं कंपनी सरकारा बरोबर तहनामा करून,त्यांतील १४ वे कलमांत त्याणीं आपला माळव्यांतील मुलूख कंपनी सरकारास दिला,तो शिंदे सरकारचे मुलखा नजीक असल्यामुळें शिंदे व कंपनी सरकार या उभयतांचे सोई करितां उभयतां सरकारानीं मुलखाचा मोबदला केला,त्याच्या यादी या तहनाम्याच्या शेवटी अ आणि क निशाणच्या जोडल्या आहेत.

जावद परगणा किल्ल्यासुद्धां महाराज अलिजा बाहादर दौलतराव यास परत द्यावा,ह्मणून कंपनी सरकारानें निश्चय केला आहे त्या मुलखाचा बंदोबस्त ठेऊन,त्यांत पेंढारी लोकांचा दंगा होऊं देणार नाहीं,ह्मणून महाराज अलिजा बाहादर कबूल करीत आहेत. येशवंत राव भाऊयास परत बोलाऊन ... त्यास जाहागीर अथवा पेनशिन नेमून देऊन त्यास जावदचे ठाण्या पासून दूर ठेवितो ,आणि त्याचे वर्तणुके बाबद मी जिम्मा घेतों असें अलिजा बाहादर कबूल करीत आहेत.

हांडिया आणि अशर गडचे किल्ल्या लगतचा मुलूख फौजेचे खर्चा करितां अलिजा बाहादर दौलतराव याणीं कंपनी सरकारास लाऊन दिला आहे. हा मुलूख पेंढारी लोकांची स्वारी पुरी जाहाल्या खेरीज जर कंपनी सरकारानें महाराजास परत दिला तर,त्याचे मोबदला कोटा आणि जोतपूर यासंस्थानावर जी महाराजाची खंडणी दरसाल यावयाची आहे,तो आणखी एकसालचा ह्मणजे तिसरे सालचे खंडणीचा ऐवज महाराज अलिजा बाहादर दौलत राव कंपनी सरकारास लाऊन देतील.

या ठरावाचे यादीवर आपली सही शिक्का करून महाराज दौलतराव याणीं रसिदेन्ट साहेबाचे हवालीं केली,त्याणें नामदार गवरनर जनरल याचा सही शिक्का करून एक यादीची नकल आणवून अलिजा बाहादराचे स्वाधीन केली असे तारिख सन सदर.

जे. इदुवर्द. अक. रसिदेन्ट

---

*. यादी फार लपशिलाच्या आहेत ह्मणून त्याचा तरजुमा केला नाहीं.

महाराज दौलतराव शिंदे यांस व त्यांचे पदरचे लोकांस कंपनी सरका रानें नक्त नेमणूक करून दिली होती ती, व रजपूत संवस्थाना कडून महा राज अलिजा बाहादरास जो सालिना खंडणीचा ऐवज पावत होता तो, ए कूण दोन रकमा आपले फौजेचे पगाराकरितां अलिजा बाहादर दौलतरा व यांणीं तीन वर्षे पर्यंत कंपनी सरकारास लाऊन दिल्या होत्या, हा पैसा त्याचे फौजे करितां खर्च होऊन, शिवाय कंपनी सरकारचा फाजील पैसा अलिजा बाहादराचे फौजे कडे खर्च जाहला आहे. आतां उभयतां सर कारचे विचारें असें ठरविण्यांत येतें कीं, नक्त नेमणूक आणि खंडणीचा ऐवजा पुर्ती फौज ठेऊन, बाकी ज्यास्त फौज असेल ती स महाराजांनीं फा रा घ्यावा.

सदरील फाजील पैशाचे फेडी करितां अलिजा बहादरानीं आप ला मुलूख कंपनी सरकारास लाऊन दिला त्याचा तपशील.

प्रांत खानदेश.

१ प्रगणें यावल. १ प्रगणें चोपडे
१ प्रगणें पाचोरे. १ प्रगणें लाहोरे पैकी बारागांव.
१ प्रगणें गडे कोट आणि मलठण
पैकीं कांहीं गांव आणि गडे कोट
चा किल्ला.

हा मुलूख कंपनी सरकारचे अमलांत आहे याकरितां असें ठरवि ण्यांत येतें कीं, सदरील कर्जाची फेड जाहल्यावर सदरील मुलूख कंपनी सर कारचे ताब्यांत राहून, त्याचा वसूल अथवा या मुलुखाचे बदला इनसाफे रजेचा शिंदे सरकारचे सोईचा दुसरे कडे कंपनी सरकार मुलूख नेमून देईल सदरील मुलुखाचा वसूल देणें, अथवा दुसरा मुलूख बदला शिंदे सरकारास नेमून देणें, यांतून जी तजवीज कंपनी सरकारास पसंत वाटेल ती तजवी ज कंपनी सरकार करील.

मुक्काम ग्वाल्हेर तारिख ६ फेब्रुवारी - } जेस्टुवर्ट रसिदेन्ट.
सन १८२० इ. } गवरनर जनरलचा शिक्का.

अलिजा बाहादर दौलतरावयाचा शिक्का.

१ हेस्टिंग.

१ जे. आदम. सी. टी. मेटकाफ्.

१ जे. इ. कोलब्रूक सेक्रटरी

---

## नंबर १३.

### नेमाड प्रांतांतील मुलुखाबद्दल कंपनी व शिंदे सरकारचा ठराव.

नेमाड प्रांतांतील गिराशी जमीदार लोकांचे मेजर जनरल माल्कम साहेबानी पेशजीं ठराव केले, त्यांत किती एक गिराशी जमीदारांस दरसाल ४०३८ रुपये आह्मीं देऊं, ह्मणून अलिजा बाहादर दौलतराव यांणीं कबूल केलें होतें, तो ऐवज सुमारें ५ वर्षाचा अलिजा बाहादरा कडून न आल्यामुळें, वीस हजार रुपये अलिजा बाहादरा कडे येणें आहेत. नेमाड प्रांतांत कंपनी सरकारचे मुलख लगत, प्रगणें धरण गांव, प्रगणे बरवीसे लाणी, पुनासे, खांडवे, हे शिंदे सरकारचे महाल असून, त्यांची बसाहात चांगली नसल्यामुळें त्याचा शिंदे सरकारास वसूल बरोबर येत नाहीं शिंदे सरकारचे महालांत अव्यवस्था असल्या मुळें, कंपनी सरकारचे मुलुखास उपद्रव वारंवार होत आहे, सदरहू महालाची बसाहात होऊन इंग्रज सरकारचे मुलखास उपद्रव होऊं नये कंपनी सरकारनें सदरील कर्ज फिटून पुढें त्यास ४०३८ रुपये दरसाल वक्तशीर पावत जावे, यास्तव सदरील प्रगण्यातील नांजकारपदारीक, व धर्मादाव वगैरे हक्क खेरीज करून, बाकीचा अमल महाराज अलिजा बाहादर दौलत राव कंपनी सरकारास देण्याचें कबूल करीत आहेत.

सदरील कर्ज फिटल्यावर पुढें दरसाल ४०३८ रुपये व महाल मजकूर खर्च वजा करून, बाकी जो ऐवज सदरील मुलखा पैकीं शिलक राहील तो कंपनी सरकार शिंदे अलिजा बाहादरास प्रति वर्षीं देत जाईल.

पुढें कायम समजून दरसाल सदरील महालचे एकंदर वसूलांतून वजा करून,बाकी राहिल तो ऐवज कंपनी सरकार अलिजा बाहादरास देत जाईल.

माळवा प्रांतांत किती एक गिराशी लोकांस अलिजा बाहादर यांचे महालांतून तनखा पावत असतो,तो अलिजा बाहादराचे, कमावीसदाराचे हातून गिराशी लोकांस बरोबर पावत नाहीं, शिंदे व कंपनी सरकारचे विच्यारें असें ठरविण्यांत येतें कीं, महाराज अलिजा बाहादर यांचे कमावीसदाराकडून गिराशी लोकांस तनखा बरोबर पावल्यास ठीक च आहे,जर कमावीसदारानीं हा ऐवज गिराशी लोकांस देण्यांस हरकत केल्यास, गिराशी लोकांचा तनखा देण्यास कंपनी सरकार मुखत्यार आहे,जो ऐवज त्याकडून गिराशी लोकांस पावेल तो सदरील महालचे वसूलांत कंपनी सरकारानें वजा करीत जावा.

मुक्काम ग्वालेर तारिख १० नवंबर
सन १८२३ इसवी.

---

## नंबर १४.

यादि नेमाड प्रांतांत जे महाल अलिजा बाहादर दौलतराव यांचे आहेत,त्यांत वस्ती नसल्यामुळें त्याचा वसूल शिंदे सरकारांत येत नाहीं,या करितां त्याची कमावीस महाराज अलिजा बाहादरानीं कंपनी सरकारास सांगितली आहे,ते माहाल बितपशील,सन १८२५ इसवी.

१ प्रगणे खांडवें. १ प्रगणे बरवई.
१ प्रगणे पुनासे. १ प्रगणे सैलाणी.
१ प्रगणे धनगांव मोसा.

सदरील महालांतील पडारक जमीन,व दुमाले गांव असतील,ते वजा करून बाकी वसूल कंपनी सरकारानें शिंद्याचे तिजोरीत दरसाल देत जावा. सदरील महालांत वस्ती नाहीं ती करून हे माहाल आबादानीस आणावे. सदर

हू महालची वसाहात होऊन कमाल जमा येऊं लागली ह्मणजे ती आपून-दाखवावी.

## नंबर १५.

शिंदे अलिजा बाहादराचे दुसरे किती एक महाल ओसाड पडले आहेत, ते आमचे वहिवाटीस दिल्यास त्याची वसाहात करून आबादानीस आणतो, ह्मणून कंपनी सरकारानें शिंदे अलिजा बाहादरास जाहीर केलें. त्यावरून अलिजा बाहादरानीं मुलखाची वसाहात करून आबादानी करण्या करितां कंपनी सरकारचे वहिवाटीस आपले माहाल लाऊन दिले. त्याचा तपशील. सन १८२५

- १ प्रगणे आसोरी, हुसेन पुरा, सेरबाग, आणि रूदी पुरा खेरीजकरून.
- १ तालुके बेलोरा.
- १ प्रगणे देऊर तालुके टनडोकरा व नारमन सुधा, प्रगणे गोबर, जाकर, सोलेट सुधा
- १ प्रगणे बानगड.
- १ प्रगणे मुदी.
- १ प्रगणे आटोद.
- १ प्रगणे पिपलोर.

सदरहू सात महाल सदरहू साला पासून वसाहात करून आबादीस आणण्या करितां, कंपनी सरकारचे वहिवाटीस दिले आहेत. त्याची कमाल बेरीज वसूल होऊं लागली ह्मणजे ती आपून दाखवावी, धर्मादाव व वर्षासने, पदारक जमीन व गांव दुमाला, नक्त खासगी, व आमिनी, शिबंदी, नेमणूक, दरख दार वगैरे महाल मजकूर खर्च, जो चालत आला असेल, तो वजा होऊन बाकी वसूल खिस्त बंदीनें कंपनी सरकार अलिजा बाहादर दौलतराव याचे खजिन्यांत भरित जाईल

## नंबर १६

तारिख १२ ज्यानेवारी सन १८४४ इसवी रोजीं ग्वालेर मुक्कामी तहनामा जाहाला तो.

### कलम १.

आणि ऐवजीं तहनामे व करार वगैरे कंपनी व शिंदे सरकारांत वेळोवेळी
जाहाले असतील, त्यांत हाल्लीचे तहनाम्यावरून जे फेरफार होतील ते खे-
रीज करून, बाकी सदरील सर्व तहनामे वगैरे उभय सरकारांत कायम राह-
तील.

## कलम २.

कैलास वासी जनकोजी राव महाराज याणीं आपले राज्याचे रक्षणा
करितां कंपनी सरकारची फौज आपले राज्यांत ठेवण्याचें कबूल करून-
तिचे खर्चास मुलुख नेमून दिला होता. त्या फौजेचा सालिना पांच लक्ष रुपये
खर्च होता. तिचे खर्चाकरितां महाराजानीं कंपनी सरकारास मुलूख लाऊन
दिला होता त्याचा दरसाल वसूल ५४६००० रुपये होतो. सदरील फौज वा-
ढवून तिचे खर्चाचा ज्यास्त बंदोबस्त करणें सांप्रत अवश्य आहे, ह्मणून अलि-
जा बाहादर जयाजीराव फौज वाढविण्याचें कबूल करून, तिचे खर्चास ज्या-
स्त मुलूख कंपनी सरकारास १३००७०० रुपयांचा नेमून देण्याचें कबूल क-
रीत आहेत; मुलखाची +निशाणी याद या तहनाम्यास जोडली आहे. पहि-
ला मुलूख व हल्लीं नवीन दिलेला मुलूख याची कंपनी सरकारानें वहिवाट
करून त्याचा वसूल फौजेचे खर्चीकडे घ्यावा.

## कलम ३.

पेशजीचा व हल्लीं नवीन लाऊन दिलेल्या मुलखाचा एकंदर महाल
मजकूर खर्च वजा जातां, बाकी वसुलाची बेरीज अठरा लक्षांहून फाजील ज-
हाल्यास, फाजील रकम अलिजा बाहादर जयाजी महाराजांस कंपनी सरका-
रानें दरसाल परत द्यावी, जर करितां वसुलाची बेरीज अठरा लक्षांहून कमी
उत्पन्न होईल तर, जितकी रकम कमी येईल तितकी जयाजी महाराजानीं कंप-
नी सरकारास दरसाल भरून द्यावी.

---

+ मुलखाचा तपशील फार असल्यामुळें यादीचा तरजुमा केला नाहीं. कदिंजट फौजेचे खर्चास कैलासवासी ज-
नकोजी महाराजानीं लाऊन दिला तो ५४६९०० रुपये वसुली असून हाल्ली जयाजी महाराजानीं लाऊन दि-
ला तो १३००७०० एकूण १८४७६०० रुपयांचा मुलूख कंपनी सरकारचे ताब्यांत गेला.

## कलम ४.

सदरील मुलुख शिवाय, अलिजा बाहादराचा दुसरा कांहीं मुलुख कंपनी सरकारचे वहिवाटीस आहे, त्याप्रमाणे नवीन लाऊन दिलेले मुलखाची वहिवाट करून, त्यांत स्वस्थता ठेऊं असें कंपनी सरकार कबूल करीत आहे.

## कलम ५.

बायजा बाई साहेबांस दिलेले एक लक्ष रुपये, कंटिंजंट फौजेबद्दल दाहा लक्ष, व इतर फौजेचे खर्चा बद्दल दाहा लक्ष, व हल्लींचे लढाई मुळें कंपनी सरकारास. लोकांस नुकसान भरून द्यावें लागेल, तें पांच लक्ष, एकूण २६ लक्ष रुपये कंपनी सरकारचे जयाजी महाराजांकडे कर्ज येणें आहेत, त्याचा भरणा या तहनाम्याचे तारिखे पासून १४ दिवसांत अलिजा बाहादरानीं करावा. या मुदतींत सदरहू ऐवजाचा भरणा न जाहाल्यास, यान हनाम्याचे लगत बे निशाणचे यादींत लिहिलेला मुलूख कंपनी सरकारचे ताब्यांत अलिजा बाहादरानीं द्यावा, त्याचा मुलकी व दिवाणी अमल कंपनी सरकारचे हातांत राहील. सदरील २६ लक्ष रुपयांस दरसाल दर शेंकडा पांच रुपये प्रमाणें व्याज आकारून व्याज मुद्दलाचा फडशा होईपर्यंत, ब निशाणचे यादींतील मुलुख कंपनी सरकारचे ताब्यांत राहील.

## कलम ६.

खुद्द जयाजी महाराज व त्यांचे वारसदार जे पुढें या संस्थानास होतील, त्यांवर व त्यांचे राज्यावर बाहेरील देशांतून परचक्र अथवा हल्ला आल्यास, अथवा अलिजा बाहादरांचे मुलखांत बंड जाहाल्यास, त्याचें निवारण करून महाराज अलिजाबाहादर जयाजीराव व त्यांचे पुढें होणारे वारिसदार त्यांचे व त्यांचे राज्याचें रक्षण तहनाम्यावरून कंपनी सरकारास केलें पाहिजे. महाराज अलिजा बाहादराची हल्लीं अतिशय फौज आहे, ती पासून महाराजाचे राज्यास त्रास आणि नजीकचे दुसरे संवस्था-

---

+ सदरील तहनाम्यांतील ५ वे कलमांत कर्जाचे फेडीसाव कंपनी सरकारचे ताब्यांत शिंदे सरकारानी द्यावा म्हणून ठराव आहे त्याप्रमाणें ५२००० चा मुलूख शिंदे सरकारानीं कंपनीचे ताब्यांत दिला असे मुलखाचा तपशील दिला नाहीं.

नऊ हजारां पेक्षां कोणते ही वेळेस ज्यास्ती माणसें अलिजा बाहादरानीं भ रूनये, तीन हजार पायदळ, बावीस तोफा, दोनशें गोलनदाज असून, बाकी भरतीस दुसरी फौज असावी, नऊ हजारां पेक्षां ज्यास्त फौज असेल ती लौकर कमी करण्याचा इलाज अलिजा बाहादरानीं करावा. फौज कमीं कर ण्याचे कामांत कंपनी सरकारची मदत अलिजा बाहादरास लागेल, तर ती कं पनी सरकारांतून मिळेल.

### कलम ७.

जे शिपाई लोक कमी होतील, त्याचा पगार अलिजा बाहादरानीं द्यावा व जे अमलदार कमी होतील, व ज्यांस कंटिंजंटांत अगर दुसरेकडे जागा मि ळणार नाहीं, त्यास महाराजानीं तीन महिन्याचा पगार बक्षीस द्यावा.

### कलम ८.

हल्लीं जयाजीराव महाराज वयानें लहान आहेत, ते प्रौढ होऊन आ पला राजकारभार संभाळण्यास लायक होई पर्यंत, राजकारभार चालवि ण्या करितां कांहीं मनुष्यें नेमिलीं आहेत, त्याची बदली करणे जाहाल्यास कंपनी सरकारचे अनुमता वांचून होणार नाहीं. नेमलेले मनुष्यांनी रसि डेन्ट साहेबाचे विच्यारे राजकारभार चालवावा. महाराजांचें वय पुरें आठव र्षांचें जाहालें ह्मणजे ते सज्ञान होतील. माघवद्य ५ संवत् १९०९ अथ वा तारिख १९ ज्यानेवारी सन १८५३ रोजीं महाराजांचे वयास आठ वर्षे पूर्ण होतील.

### कलम ९.

रामराव फाळके बाहादर समशेरजंग, देवराव जाधव मामा सा हेब, दबीर उदौला, मुनसीराजे बळवंतराव बहादूर, उदाजीराव घाटगे, मुल्लाजी, नारायणराव भाऊ यमाजी पोतनीस, इतके मनुष्य महाराज अज्ञान आहेत तों पर्यंत राजकारभार चालविण्यास नेमिले आहेत, त्यां त रामराव फाळके अध्यक्ष होतील.

### कलम १०.

श्रीमंत ताराबाई साहेबाचे खर्चाची नेमणूक त्यांचे योग्यतेनुरूप पृथक् व्हावी, हें वाजबी जाणून त्याचे खर्चास सालिना तीन लक्ष रुपयाची नेमणूक केली आहे.

## कलम ११.

महाराज जयाजी रावाचे व त्याचे ताब्यांतील रयतेचे इनर संवस्थानातून जे जमीनी वरील हक्क असतील, ते कायम राखण्या करितां कंपनी सरकार तजवीज ठेवितील.

## कलम १२

हा बारा कलमाचा तहनामा ठरविण्यास कंपनी व शिंदे सरकारांतील अंमलदार होते त्याचा तपशील.

कंपनी सरकारचे अंमलदार.

१ लाई यलिन बारोसाहेब.
१ एफ्. करी साहेब.
१ डब्ल्यु एच स्लीमन.

शिंदे सरकारचे अंमलदार.

१ रामराव फाळके बाहादर समशेरजंग.
१ मुनशी राजा राजेबळवंत राव.
१ देवराव भाऊ जाधव.
१ उदाजी राव घाटगे.
१ नारायणराव भाऊ.
१ मुलानी.

सदरील उभय पक्षाकडील अंमल दारानी सदरील तहनामा ग्वाल्हेर मुक्कामी तारिख १३ ज्यानेवारी सन १८ ४४ इसवी रोजीं ठरविला तो उभय सरकारांत मंजूर जाहाला असे.

---

## नंबर १७.

### महाराज जयाजी राव सिंदे यास दत्तका बद्दल सनद

तारिख ११ मार्च सन १८६२.

हिंदुस्थानांतील जे रजवाडे व संस्थानिक आपले मुलखाचा कारभार पाहात असतील, ते निरंतर राहावे आणि त्यांचे खानदानीचा

मात्र मरातब चालावा अशी विलायतेतील माहाराणी विकृतोरिया यांची इच्छा आहे. हा मजकूर सन १८५९ सालचे दिजंबर महिन्यांत जो आग्रे मुक्कामीं दरबार जाहला, त्यांत मी आपल्यास निवेदन केलाच आहे. आपल्यास अगर आपले वारसदार जे या राज्याचे पुढें अधिकारी होतील, त्यांस औरस वारस न जाहल्यास आपण अथवा आपले वारसांनीं आपले कुलांतील सांप्रदाया प्रमाणें दत्तक घेतला असतां, तो आपले राज्यास राणी सरकारांतून कबूल करण्यांत येईल.

आज पर्यंत जे तहनामे, करार वगैरे उभयतांत जाहाले असतील, त्यांस अनुसरून आपले घराणें जों पर्यंत राणी सरकाराशीं एकनिष्टपणे इमानानें वागेल, तों पर्यंत या करारांत राणी सरकारांतून कांहीं अंतर येणार नाहीं, येविशीं आपली खातर जमा असावी.

सही कॅनिंग साहेब.

---

## नंबर १८.

मुक्काम बनारस (काशी) येथें तारिख २२ दिजंबर सन १८६० इसवी रोजी तहनामा जाहाला तो.

सन १८४४ सालीं महाराज जयाजी राव याणीं फौजेचे खर्चाकरितां कंपनी सरकारास मुलुख नेमून दिला होता. सन १८५७।५८ इसवी सालचे बंडांत महाराजांनीं इंग्रज सरकारास मदत केली, ह्मणून त्यानीं नेमून दिले मुलखा पैकीं तीन लक्षांचा मुलुख त्यांस परत द्यावा असें इंग्रज सरकारचे मनांत आलें आहे. नरमदा नदीचे दक्षणेस, आणि मुंबई इलाख्यांत जो महाराजांचा मुलुख आहे, तो इंग्रज सरकारांत घेऊन त्याचे बदला महाराजानीं नेमून दिले मुलखा पैकीं महाराजास मुलुख परत द्यावा. जो मुलूख महाराजानीं इंग्रज सरकारास नेमून दिला आहे, त्यावर राज सत्ता महाराजांची असून मुलखाची वहिवाट मात्र इंग्रज सरकाराकडे आहे, यामुळे उभय सरकारांत वारंवार जिकीर पडते ती दूर व्हावी. अवरा लक्षांत तूट आल्यास, त्या तुटी बद्दल महाराजांस नेहमी माफी असावी, आणि फौज बाळगण्याचे कामांत ही त्यांस ज्यास्त अ-

धिकार घ्यावा, असें इंग्रज सरकारचे मनांत आलें आहे. सन १८५४ साल चे तहनाम्यांतील ५।७।८।९।१० हीं कलमें कांहीं काल पर्यंत अमलांत या हाणारीं होतीं. हल्लीं जो उभयतां सरकारच्या संबंध आहे, त्यांत सदरील कलमांचा उपयोग होत नाहीं; यास्तव तारिख १३ ज्यानेवारी सन् १८५४ इसवी रोजीं जो तहनामा जाहला आहे तो रद्द करून, त्याचे ऐवजीं हा तहनामा उभय सरकारांतून ठरला आहे.

## कलम १.

सन १८५४ तारिख १३ ज्यानेवारीचे पूर्वीं जे तहनामे व करार इंग्रज व शिंदे सरकारांत जाहाले असतील, त्यांत त्या तहनाम्यावरून जो कंपेशा अगर फेरफार होईल, तो खेरीज करून बाकी सर्व तहनामे व करार वगैरे उभय सरकारांत कायम आहेत असें समजावें.

## कलम २.

सन १८५७।५८ इसवी सालचे बंडांत महाराज जयाजी राव यांणीं इंग्रज सरकारास मदत केली, ह्मणून त्यानीं इंग्रज सरकारास जो मुलूख पूर्वीं नेमून दिला आहे, त्यापैकीं तीन लक्षांचा मुलूख इंग्रज सरकारानें खुष होऊन महाराजांस परत दिला आहे.

## कलम ३.

पंजमहालांत, नरमदेचे दक्षिण किनाऱ्यास, आणि बेतवा नदीचे काठीं प्रगणे कजींचा, इतका मुलूख महाराजांचा आहे, त्यावरील राज सत्ता पुढील शर्ती अन्वयें महाराजांनीं इंग्रज सरकारास दिली आहे.

१ जितके आकाराचा मुलूख महाराजांकडून देण्यांत येईल, त्याचे बद्दल तितके आकाराचा मुलूख इंग्रज सरकारानें त्यांस द्यावा, उभयतांचे मुलखाचा आजमितीस जो वसूलीं आकार असेल, त्या बेरजा कायम धरून मोबदला व्हावा.

२ महाराजांचा जो मुलूख इंग्रज सरकारांत येईल, त्यांत खंडणीचा वगैरे जो महाराजांचा फायदा असेल, तो ग्वालेर येथील इंग्रज सरकारचे तिजोरीतून पुढें अदा होत जाईल. इंग्रज सरकार खर्ची रुपये देईल त्याचा बटा वजा करून घेईल.

३ उभयतां सरकारानीं आप आपले मुलखांतून जे रयतेस कौल क रून दिले असतील, त्याच्या मुदती अखेर होई पर्यंत, मुलखाचा मो बदला झाल्यावर परस्परांचे कौल परस्परां सरकारानीं चालवावे, म्ह णजे मुलुख ताब्यांत आल्यावर पेशजीचे कौला प्रमाणें नवीन कौ ल प्रत्येक सरकारानें रयतेस करून द्यावे.

४ इनाम, जाहागीर वगैरे दुमाला जो वंश परंपरेचा हल्लीं चालत अ सेल, त्याच्या व हक्कवतनें जीं हल्लीं चालत असतील, त्याच्या उभय तां सरकारानीं एकमेकांचे रयतेस पेशजीचे संनदे प्रमाणें नवीन स नदा करून द्याव्या.

## कलम ४.

सदरील तिसरे कलमांत लिहिले शरती अन्वयें महाराज जयाजी राव आपला खालीं लिहिलेला मुलुख इंग्रज सरकारास देत आहेत त्या चा तपशील.

| | |
|---|---|
| १ अहंमदनगर. | १ सोलापूर. |
| १ खानदेश. | १ आग्रा आणि मथुरा जिल्ह्यांतील बीडी परगणा. |
| १ पुणें. | |
| १ सातारा. | १ अजमीर जिल्ह्यांतील जाहागीर. |

सदरील मुलखा पैकीं खालीं लिहिले गांव पेशजीं चालत आल्या प्रमाणें महाराज जयाजीराव यांचे कबज्यांत राहतील त्याचा तपशील.

| | |
|---|---|
| १ कसबे श्रीगोंदे विघावणसुद्धां. | १ मौजे जामगांव. |
| १ मौजे घोसपुरी. | १ मौजे पिंपळगांव. |
| १ कसबे पारस. | १ मौजे देऊळगांव. |
| | १ मौजे कुम्हेरखेड. |

## कलम ५.

शिंद्यां कडून जो मुलूख इंग्रज सरकारांत आला आहे, त्याचे बदल या तहनाम्यांतील कलम ३ यांत ज्या शर्ती व करार लिहिले आहेत, त्या प्रमाणें शहर झांशी किल्या सुद्धां, व त्याजवळचा फुलवरील मु

सांदिला आहे.

## कलम ६.

सदरीं लिहिले करारा प्रमाणें मोबदल्याचे मुलखाची आकारणी जाहल्यावर, उभयतां सरकारांतून मोबदल्याबद्दल एकमेकांस पत्रें तारिख १ मे सन १८६१ चे आंत द्यावी. हल्लीं रबीचें पीक जें शेतावर उभें असेल, त्याचा फायदा परस्परां सरकारास मिळावा.

## कलम ७.

हा सदरील मुलखाचा मोबदला जाहाल्यावर, शिंदे सरकारांतून जो मुलूख इंग्रज सरकारास अमानती दाखल नेमून दिला आहे, त्याची राजकीय सत्ता शिंदे सरकारांतून इंग्रज सरकारास देण्यांत येईल.

## कलम ८.

जयाजी महाराजांचे मुलखांत इंग्रज सरकार आपली फौज ठेवील, तीचा सालिना खर्च १६ लक्ष रुपया पेक्षां कमी होणार नाहीं, असें इंग्रज सरकार कबूल करीत आहेत.

## कलम ९.

जयाजी महाराजांनीं खुद्द आपले निसबतीची किती फौज ठेवावी, त्याचा तपशील पुढें लिहिला आहे. त्याहून ज्यास्त फौज महाराजांनीं ठेऊं नये.

| | | |
|---|---|---|
| १ | तोफखान्याकडे. | ३६० गोलंनदाज व तोफा ३६. |
| १ | पायदळ. | ५००० शिपाई. |
| १ | रिसाला | ६००० घोडे स्वार. |

## कलम १०

हा दाहा कलमाचा तहनामा काशी मुक्कामीं उभय सरकारचे अमलदारानीं ठरविला तो उभयतां सरकारानीं तारिख १२ दिजंबर सन १८६१ इसवी रोजीं मंजूर केला असे. हा तहनामा ठरविण्यास अंमलदार होते त्याचा तपशील.



| निसबत शिंदे सरकार. | निसबत इंग्रज सरकार. |
| --- | --- |
| १ जगदेव राव माहूरकर. | १ रिचमंड क्यांबेल शेक्सपीयर एजंट. |
| १ बाळाजी चिमणाजी. | |

---

## नंबर १९.

खलिता तारिख ९ अगष्ट सन १८६१.

मेहेरबान एजंट साहेब बाहादूर यांजकडे.

महाराज जयाजी राव शिंदे अलिजा बाहादर यांजकडून.

सलाम अंकी दक्षिण प्रांतीं सात गांव, आणि जामगावांतील दोन वाड्या आमच्या कडे पूर्ववत प्रमाणें राहाव्या, ह्मणून तारिख १२ डिजंबर सन १८६० रोजीं जो तहनामा जाहाला त्यांत ४ थे कलमांत मजकूर लिहून, सात गांव व दोन वाड्या मोबदल्याचे मुलखांतून वजा केल्या आहेत. उभय सरकारची दोस्ती व फायदा जाणून सदरील सात गांव व दोन वाड्या इंग्रज सरकारास देऊन, त्याचे बदला गांव तितके किंमतीचे फजवर आह्मांस मिळाले आहेत, या करितां सदरील तहनामांतील चवथें कलम रद्द करण्या विषयीं, तुह्मीं नामदार गवरनर जनरल यांची परवानगी मागावी कळावें.

---

## नंबर २०.

खलिता तारिख १४ अक्टोबर सन १८६१.

महाराज जयाजी राव शिंदे अलिजा बाहादर यांस.

एजंट साहेब यांजकडून.

सलाम आपला मनोदय नामदार गवरनर जनरल यांस कळविण्यांत येऊन, नामदार साहेबांनीं आपलें ह्मणणें कबूल केलें आहे, आणि नामदार साहेब आपल्यास असें कळवितात कीं, हे खलिते सदरील तहनाम्यास लगत करून ठेवावे.

---

# नंबर २१.

यादि सन १८४४ इसवी सालचे तहनाम्या अन्वयें शिंदेसरकारानीं कंपनी सरकारास फौजेचे खर्चा करितां मुलुख व खंडण्या रुपये १८४१६४९८२६६ च्या दिल्या त्याचा तपशील.

६ सिंद व पाहूज नद्यांचे कांठचे महाल.

१ भांडारी प्रगणा. १ गडेभाहू प्रगणा.
१ माहुमोहनी प्रगणा. १ इंदूरकि प्रगणा.
१ कछवागड प्रगणा. १ नोधा प्रगणा.

१ प्रगणे चांदेरी.

४ प्रांत निमच पैकीं महाल.

१ प्रगणे जावद. १ प्रगणे जिरण.
१ प्रगणे गंगापूर. १ प्रगणे रतनगड.

३ प्रांत दुसंगाबाद.

१ प्रगणे हरदेहांडिया. १ प्रगणे सरअसनी मावर.
१ प्रगणे च्यारठाणे.

१ प्रांत माळवा प्रगणे मानपूर
१ प्रांत खानदेश प्रगणे याबल, चोपडे,
१ प्रांत नेमाड.
३ प्रांत सागर पैकीं महाल.

१ प्रगणे राधागड. १ प्रगणे मळ गोण
१ प्रगणे गडेकोटा.

७ खंडण्यांचा तपशील.

१ संवस्थान कोटा १ कोटा संस्थानचे ताब्यांतील सातकोत्री.
३ रतलम, सीलाणी, चादेरी.

१ जोनपूर.

१ अंमजेरा.

---

सन १८६० तारिख १२ दिजंबरचे तहनाम्या अन्वयें इंग्रज सरकारानें शिंदे सरकारास ४६३६२२८६३ चा मुलूख परत दिला. १२९७६२२८११-८४ जो मुलूख इंग्रज सरकारचे ताब्यांत राहिला त्याचें राजकीय स्वामित्व सदरील तहनाम्या प्रमाणें शिंदे सरकारानें इंग्रज सरकारास दिले त्याचे महालाचा तपशील.

१ प्रगणे किसोरी पटया आमलपैकीं गांव किती ते समजत नाहींत

१ प्रगणे कुछ वागड गांव १६०

१ प्रगणे हारदे हाडयां गांव ७६२

१ प्रगणे च्यारगाणे गांव ६

१ प्रगणे यावल चोपडे गांव २७२

१ प्रगणे राधागड गांव ११३

१ प्रगणे भंडेरी गांव ८०

१ प्रगणे चांदेरी गांव ३८०

१ प्रगणे सठवास नीमावर २१४

१ प्रगणे मानपूर गांव २८

१ नेमाड पैकी महाल गांव ७६१

१ प्रगणे मलठोण गांव ७८

१ प्रगणे कोटा गांव ७७

---

खंडणीचा ऐवज ३७०६९२८१४८६ शिंदे सरकारानीं इंग्रज सरकारास लाऊन दिला आहे त्याची वहिवाट इंग्रज सरकारानी पूर्ववत प्रमाणे करावी.

---

१ सई अलिजाबाहादर जयाजीराव यांची.

१ बाळाजी चिमणाजी दिवाण यांची सही.

१ सई गणपतराव खडके नायब दिवाण.

---